# ढोल

आदिवासी बोलीभाषेचे नियतकालिक

मुख्य संपादक : अरुणा जोशी
अहिराणी आवृत्तीचे संपादकः डॉ. सुधीर देवरे

भाषा संशोधन प्रकाशन केंद्र, वडोदरा

**ढोल : आदिवासी बोलीचे नियतकालिक**
**अहिराणी : अंक ३ : फेब्रुवारी २०००**

प्रकाशक
**भाषा संशोधन-प्रकाशन केंद्र**
६, युनायटेड ॲव्हेन्यू, दिनेश मिल जवळ
वडोदरा- ३९० ००७

मुद्रक
**आकार ऑफसेट**
दांडिया बाजार, वडोदरा-३९० ००१

छायाचित्रे
**चक्रधर सासवडे, धर्मेश भावसार**

रेखाचित्रे
**हरि मानसिंह राठवा**

मूल्य
**ह्या अंकासाठी रू. २५/-**
**प्रति अंकी रू. १५/-** (+ रु.५ आवश्यक तेथे टपालखर्चासाठी)
**वार्षिक वर्गणी रू. ३०/-**(टपालखर्चासह, प्रतिवर्षी दोन अंकांसाठी)

वर्गणीसाठी संपर्क
भाषा संशोधन-प्रकाशन केंद्र, ६ युनायटेड ॲव्हेन्यू, दिनेश मिलजवळ, वडोदरा-३९० ००७, गुजरात.
डॉ. सुधीर देवरे, बस स्थानकामागे, सटाणा-४२३ ३०१, जि. नाशिक, महाराष्ट्र.

## अनुक्रमणिका

# झाबुआ जिलानो झुझार आदिवासी...

घनश्याम गढवी

*घनश्याम गढवी ह्या अहमदाबादमा ऱ्हातंस, पन त्यासनी मध्यप्रदेशना भिलस्मा खूप वर्षसपशीन काम करेल शे. त्यासनी गुजराती भाशामा लिहेल ह्या गीत अठे गुजरातीमाच (पन मराठी अक्षरसमा) दिधेल शे.*

झाबुआ जिलानो झुझार आदिवासी...

लुंटफाट वेर जूनां ! दारू अने देकारा
अनर्थ खून खराबी खूंखार आदिवासी !

तिरकामठु ने भालो को धारीयुं कटारी
गोफण गीलोल पत्थर तरवार आदिवासी !

होहो करीने धूणे बेसीने कोइ खूणे
छे आंधळी श्रद्धानो अवतार आदिवासी !

माथे रंगीन पट्टी गाले ने भाले छुंदणां
केडे घुघरीयो धमके शणगार आदिवासी

जुनी लंगोटी बदले उडावे मांस लोचा
ढींचे शराब नाचे तहेवार आदिवासी !

जे रीते कशुंये न चालवानो संभव
ओ रीते चलावे संसार आदिवासी !

मां हिंदनो पनोतो कुमार आदिवासी
आखा जगतनो लागे उतार आदिवासी !

लइ ले तो जीव लइ ले भेंकार आदिवासी
दइ दे तो शीश दइ दे दिलदार आदिवासी !

सरकारनी दया छे जंगल उपर छे पहेरा
भटकी रह्यो छे भूख्यो बेकार आदिवासी !

सरकार ने शरम ओ बन्ने विरोधी तत्त्वो
उपचार विण कणसतो बिमार आदिवासी !

दे व्याज उंधी कांधे, बेठा दलाल खांधे
कल्पी शकेज क्यांथी उद्धार आदिवासी !

छे प्रेम निखालसता, छे अणसमज गुलामी
शिकारी खुद थयो छे शिकार आदिवासी !

त्यां छाजुं छानुं रोइ आकाश सामुं जोइ
कोने करी रह्यो छे पोकार आदिवासी

ओ पण कशुं न समजे, ओने कोइ न समजे
कोनो अहीं ओ माने आभार आदिवासी !

जे दी' प्रगटशे ज्वाळा ब्रह्मांड भडके बळशे
धुंधवाइ बहु रह्यो छे अंगार आदिवासी !

# संपादकना दोन शब्द

*जगमजारली कोनतीबी येक उलशी संस्कृतीनं रूप हायी विश्व संस्कृतीनंच येक दर्शन ऱ्हास. म्हनून भारतमजारला आदिवासीसनी संस्कृतीना अभ्यास हाऊ विश्वसंस्कृतीनाच येक 'अविभाज्य' भाग शे. 'ढोल' ह्या नियतकालिकमजारतीन आदिवासी संस्कृतीना आविष्कार व्हताना दिसना तरी आपू जागतिक संस्कृतीनंच येक विशिष्ट रूप समजी घी राह्यनूत, आशे म्हननं पडयी.*

*जगप्रसिध्द चित्रकार व्हॅन गॉफ आनि गोगा, आदिवासी लोकस्मा जाईसन राह्यनात. आदिवासीसमा राहिसन त्यास्नी आदिवासीपन 'आत्मसात' कयं. तो आदिवासीपनना अनुभव आपली कलामजारतून चित्रासमजारतून आविष्कृत कराले लागनात. आनि त्या कलाकार म्हनीसन अमर जयात. कुसुमाग्रज ह्या मराठी कवी. यासनीबी पेठ, सुरगाना, ठाना ह्या महाराष्ट्रमजारला आदिवासी भागमा आदिवासीसकर्ता खूप योजना सुरू कया व्हत्यात. त्यामा ग्रंथालय, पुस्तक पेटी अशा काही महत्वन्या प्रबोधन योजना व्हत्यात. ज्ञानपीठ आनि मॅगेसेस पारितोषिक प्राप्त महाश्वेता देवी ह्या महान लेखिकासुध्दा लेखकपन जपासाइ आदिवासीसनी सेवा करनंच आपलं पहिलं कर्तव्य मानतंस, परत्येक मोठा कलाकार हाऊ आदिवसीपनकर्ता झपाटेल ऱ्हास, आशाच ह्यावरून अनुमान काढता यी. डॉ. गणेश देवी हायीबी येक ठळक उदाहरन शे.*

*व्याधना बानघाई 'मैथुनमग्न' जोडी मजारलं येक पाखरू घायाळ जयं, म्हनून वाल्मिकले जी पीडा जयी त्यामजारतून पहिली कविता जन्मले वनी. यामा व्याध हाऊ जशा आदिवासी शिकारी शे, तशाच पहिला कवी वाल्मिकी हाऊ सुध्दा आदिवासीच शे.*

*आदिम मानव म्हनजेच आदिवासी. आदिवासी शिकार कराकर्ता यातुविधीना वापर करे. म्हनजे शिकारले जावानं आगोदर तो आपली गुहामा शिकारना-प्रानिसना चित्र काढे. आनि त्या चित्रस्ले बान मारे. म्हनजे आता आपुले शिकार मिळयी, आशी त्यानी श्रध्दा राहे. ह्या यातुविद्याना प्रसारमजारतून शिल्प-चित्र ह्या कलास्ना उगम जया. म्हनजे 'चित्र-शिल्प' ह्या कलास्ना जन्मले आदिवासीसनी 'महत्वपूर्न भूमिका' शे, आशे ध्यानात येस.*

*शिल्प-चित्रसनागतच वाङ्मय ह्या कलाबाबतबी म्हनता यी. येगयेगळ्या घटनासना आनंद आनि शोक साजरा कराकर्ता ज्या गाना आदिवासी आपोआप गावाले लागनात त्या कवितास्ले आज आपू लोकगितं म्हनतंस. लोकगितं, लोककथा, आख्यान, मंत्र ह्या आदिवासीसन्या वाङ्मयीन कलाकृतीच शेतीस.*

*आपला भारत देशमा आदिवासी जमाती खूप मोठा परमानखाल शेतीस. ह्या आदिवासीसमुळेच भारतन्या सांस्कृतिक परंपरा शाबूत शेतीस. भारतमजार गोंड, मुंडा आनि भिल ह्या मुख्य आदिवासी जमाती शेतीस पैकी महाराष्ट्र, मध्यप्रदेश, गुजरात आनि राजस्थान ह्या राज्यसमा भिल आदिवासी खूप संख्यासमा शेतंस. त्यासनी सगळी लोकसंख्या जवळ जवळ दोन कोटी व्हयी अशा अंदाज शे. येवढा मोठा आकडा पाह्या*

ते येखादा उलसा देशनी लोकसंख्या येवढी भिलसनी लोकसंख्या शे. म्हनून हाऊ 'ढोल' ना अंक खास 'भिल संस्कृतीना विशेष अंक' म्हनीसन प्रसिध्द व्हयी ऱ्हायना. यावात महाराष्ट्र, मध्यप्रदेश, गुजरात आनि राजस्थान ह्या चारी राज्यस्मा राहनारा भिल समाजना सांस्कृतिक, आर्थिक, मानसिक वृत्ती प्रवृत्तीसना आढावा पाव्हाले-वाचाले मिळई. मांगला दोन अंकसनागतच हाऊ अंक सुध्दा अभ्यासूसले 'संग्राह्य' अंक वाटई अशी आशा शे.

अहिरानीमा आजपावत थोडाबहुत पुस्तकं प्रकाशित व्हयेल शेतंस. त्यासना लेखकसना 'उल्लेख' बी ढोल ना मांगला दोन अंकसना 'संपादकना दोन शब्द' समा करेल शे. अहिरानीवरला ह्या बहुतेक पुस्तकसनं माध्यम तरीबी मराठीच शे. मात्र 'ढोल' हायी अहिरानी भाशामा पहिलं नियतकालिक शे, आनि ह्या नियतकालिकनं सगळं माध्यम अहिरानी शे. अहिरानी भाशामा अमूक येक पहिलं नियतकालिक निंघनं व्हतं, आशे जर कोनले माहिती व्हही ते तशे त्यास्नी आमले जरूर सांगवा. म्हनजे 'अहिरानी ढोल' अंकले 'पहिलं' हायी विशेषन लावनं आम्ही बंद करसूत.

बडोदानी 'भाशा संशोधन केंद्र' हायी सेवाभावी संस्था शे. हायी केंद्र, भाशा आनि आदिवासीसकर्ता काम करस. संस्थाले कोनतंबी शासकीय अनुदान नही. तशेच 'ढोल' ना कोनताच अंकमा येकबी जाहिरात प्रकाशित व्हत नही, हायीबी आपला ध्यानात वनं व्हयी. ढोलना पाचशे अंक निंघतंस. आनि पाचशे जन जरी वर्गनीदार जयात तरी सगळा खर्च वसूल व्हनार नही. म्हनून थोडाबहुत भार हलका व्हवाकर्ता का व्हयेना परत्येक अहिरानी भाशिकनी 'ढोल' ना वर्गनीदार सभासद व्हवाले पाहिजे, आशा आम्हना आग्रह शे. तुम्हना प्रतिसादनी वाट पाही राहिनूत.

-डॉ. सुधीर देवरे
बसस्थानकाच्या मागे, सटाणा-४२३ ३०१, जि. नाशिक (महाराष्ट्र)
दूरध्वनी- ०२५५५-२१३५७



# भाशा वृत्त

अरुणा जोशी

*सौ. अरुणा जोशी ह्या सगळा 'ढोल' समूहन्या संपादिका शेत. तशेच भाशा संशोधन केंद्रमा कार्यरत, आदिवासी कार्यकर्ता संघटक आनि मराठी, गुजराथी, इंग्रजी हिन्दी भाशा जानकार. भाषा केंद्रनी आजपावतनी नवीन कामगिरी तशेच पुढे सुरु करानं कामसना बाबतमा आठे त्यास्नी लिहेल शे.*

मांगला येळे आपू ढोलमातून भेटनूत त्याले आता खूप महिना व्हयी गयात. आदिवासी भाशा, कला आनि संस्कृतीनं जतन कराकर्ता भाशा केंद्रनी आपला प्रयत्न चालू ठी येल शेतंस. हायी काम करता करता ध्यानात इयेल गोट म्हनजे येकते संस्कृतीनं जतन कराकर्ता आदिवाशीसमा त्याना सगेंच आधुनिक जगमा बाकीना समाजससांगे टिकाकर्ता तो आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक गोष्टीसमा सुद्धा सक्षम आनि स्वयंपूर्न म्हनीसन उभा राव्हाले पाहिजे. आनि त्यानामा आत्मविश्वास सुद्धा जागा व्हवाले पाहिजे. मांगला काही महिनासमा भाशा केंद्रनी याकर्ता काही ठाम पावलं उचलात.

मांगला येळे सांगेल परमाने तेजगढले आदिवासी कलाकारसनी सहकारी मंडळ सुरू व्हयेल शे. हायी मंडळी आता जागोजागे कला हस्तकलाना प्रदर्शनमा भाग घीसन आपला व्याप वाढावाले लागी. बागे बागे ह्या सगळा कार्यक्रमसनं व्यवस्थापनबी ह्या मंडळमझारला कलाकार सवताच पाव्हाले लागनात. हायी स्वयंपूर्ण कला जगमा ठसा उमटावाले लागी. उलसं कर्ज काढाकर्ता बचती पाडा सुरू करीसन त्यासनं सरकारी बँकाससांगे गाठ घाली देवानं कामबी व्हयेल शे. आगोदर ह्या योजनासकर्ता रोटरीक्लब सारखी जागतीक संस्थानीबी खूप मदत दिधी आनि त्यानंतर ते खूप संस्थासनी मदत करानी तयारी दखाडी आनि ग्रामीन प्रदेशसमा आनि बडोदा शहरमजारला मजूरी करनारा आदिवासीसकर्ता ती राबाडाना विचार सुरु शे.

तेजगडना आजूबाजूना भागातला जवानसकर्ता येक संगणक शिक्षन केंद्र भाशाना जवान कार्यकर्तासनी सुरू करेल शे. तेजगडसारखा उलसा गावातला, ज्यासनी संगणक कैन्हच पाह्याबी नव्हता, आशा आदिवासी बिनआदिवासी जवानसकडथायीन ह्या केंद्रले खूप मोठा प्रतिसाद मिळना, आनि आता ह्याच जवान संगणकवर पुस्तकं तयार कराले लागनात. आदिवासी आनि संगणक ह्या दोन्हीसले सपनातबी एकत्र पाह्या नहीत आशा समाजले ह्या जवान कार्यकर्तासनी आपला आत्मविश्वासमुळे येक आदर्श घाली दिधा.

आपला जन्मोजन्मीना व्यवसायवर उद्योगसवर विज्ञान प्रगतीमुळे गदा वनी त्यामुळे इंग्रजसले त्यासनी खूप इरोध कया, आशा फिरस्त्या जमातीसले इंग्रजसनी अखेर तुरुंगात टाकीसन येक जाहिरनामा काढीसन त्यासले कायमनं गुन्हेगार ठरायं. पारधी, वडार, येराकुला, सांसी, छारा, वाघरी, चामठा, साबर अशा खूप जातीसना कपाळवर जन्मताच गुन्हेगार शिक्का स्वतंत्र भारतमाबी आजून पुसायना नही आनि ह्या जातीसवर आजूनबी अत्याचार सुरुच शेतंस. आशा जातीसवरला अन्यायविरूद्ध लढाकर्ता आनि त्यासले मदतना हात देवाकर्ता भाशा केंद्रना पुढारपनखाल DNTRAG

भटक्या विमुक्त जमाती हक्क रक्षण समीती मांगला वरीसलेच स्थापन जयी व्हती. निरपराध माणूसले योग्य न्याय मिळायी देवाकर्ताच ह्या येगयेगळा समाजसनं संघटन करी त्यास्नामा जागृती करीसन नवीन नवीन कल्यानकारी उपक्रम सुरू कराले भाशा केंद्रले यश मिळेल शे. इंग्रजीमा बुधन ह्या नावनं येक नियतकालीक कायम निंघस त्यानासंगे आता DNTRAG कडून गुजराती आनि मराठीमाबी ह्या कामकर्ता उलश्या पत्रिका सुरू करेल शेतीस.

ह्या सगळा कामं ते शेतंसच पन आदिवासी भाशा कला, इतिहास, संस्कृति संशोधन संकलनना कामलेबी भाशा केंद्रनी चालना दिधी. आशा सगळा अभ्यास प्रकल्पसमा येक खूप मोठं पाउल भाशा केंद्रनी उचलं, ते म्हणजे, तेजगडले 'राष्ट्रीय आदिवासी अकादमी' उभी करानं काम. तेजगडलेच दहा येकर जमिनना तुकडा सरकारकडथायीन मिळावाकर्ता भाशा केंद्रले यश वनं आनि त्या जमीनवरच १५ जून ९९ ले राष्ट्रीय आदिवासी अकादमीना कोनशिला समारंभ जया. १९ आक्टोबर- दसरानं दिवस आदिवासी मेळावा सोबतच अकादमीना पाया भरानी सुरूवात कयी. जानेवारी २००० पशी अकादमीमा 'Post Graduate Research Orientation Courses' सुरू व्हतीन. भारतभरना आदिवासी कलाकार-कारागिर यासनं सांगेच आदिवासीसबद्दल इतिहास, मानववंशशास्त्र, पुरातत्व, स्थापत्य, शेती आणि ग्रामीन तंत्रज्ञान, भाशा, साहित्य, कला, डिझाईन, विज्ञान, वैद्यक आशा कितीतरी क्षेत्रसमा संशोधन करनारा संशोधकसकर्ता हायी अकादमी माहेरघर वाटयी. आदिवासीसबद्दल निरनिराळ्या संस्थासमा काम करनारा, सरकारी खातासमा नोकरी करनारा उमेदवारसलेबी ह्या अकादमीना फायदा घेता यी. पन हायी अकादमी नुसती पुस्तकी अभ्यास संशोधन करनारी संस्था नही, ते जिताजागता आदिवासीससंगे राहतीन, काम करतीन, आशी त्यासनी सवतानी संस्था राही. आठे आदिवासी कलाकार, वैदू, शेतकरी बाहेरून इयेल संशोधकले, तज्ञले बरोबरीना नाताखाल आपली कला सादर करी दखाडयी. आदिवासीसना रोजना जगाशी सुद्धा अकादमीनं नातं राही. ह्या भागमा वाढेल चोरी दरोडासबद्दल भाशा केंद्रनी इठला पोलीस खातासांगे आदिवासीसना प्रत्यक्ष संवादना येक कार्यक्रम कया. त्यामा निव्वळ तोंडी आमंत्रणवर ह्या भागातला तीन हजार आदिवासी हजर ऱ्हायनात. हाऊ भाशा केंद्र आनि आदिवासी अकादमी यासना आदिवासीससांगे कशे जवळनं नातं शे, त्याना बोलका पुरावा शे. यानंबरोबरच दरवरीसले तिरकामठा स्पर्धा आनि नाचना मेळावाबी व्हंस.

आदिवासी अकादमीनं बांधकाम तज्ञ आर्कीटेक्टनी देखरेखखाल पन तरीबी आदिवासी शैलीमा आनि आदिवासी कारागीर-तंत्रज्ञसकडथायीन व्हयी राह्यनं. ह्या अकादमीनी इमारतमा वाचनालय, वस्तुसंग्रहालय, कार्यशाळा, व्याख्यान आनि संवादकर्ता जागा, ऱ्हावाकर्ता घरं, डॉक्युमेन्टेशन सेंटर, प्रिंटींग प्रेस, विज्ञान केंद्र आशा निरनिराळ्या सोयी ऱ्हानार शेतीस. आनि इमारतना परीसरमा आपला देशी झाडसनी लागवड करनी शे. परत्येक झाडले आदिवासी जातनं नहीथे आदिवासी भाशानं नाव देनं शे. म्हनजे आठे जित्त जागतं सळसळतं आदिवासी जनवन-भाशावन तयार व्हयी. आनि त्यानी कुशीमा आदिवासी अकादमी सुदृढ व्हयी, मोठी व्हयी.

आदिवासी अकादमी ज्या भुईवर उभी राही ऱ्हायनी, त्या परिसरमा फिरता फिरता येक दिवस डॉ. गणेश देवी आनि कार्यकर्तासले मातीना भांडाना येक तुडका मिळना. कुतुहलखाल जानकारसले तो दखाडा ते तो खूप प्राचीन व्हता आशे समजनं. त्यानंतर मंग पुरातत्व विभागनी तठे जरासं संशोधन कयं ते तठे कोराजना डोंगरवर चढत जायेल येक खूप मोठी दगडी भीत सापडनी. आनि मातीना भांडासना खूप 'अवशेष' सापडनात. यावरतीन आठे खूप जुनी मानवी वस्ती व्हयी आशा अंदाज करता येस. आनखी सखोल संशोधन सुरू शे. ह्या प्राचीन वसाहतपशी आजन्या स्थानिक आदिवासी वस्ती पावतना येक सलग परंपराना मागोवा घेता येवानी शक्यता शे.

आदिवासी संस्कृती, भाशा, इतिहास, समाजजीवन, ह्या सगळासविशयी हायी सगळी चळवळ भाशा केंद्रनी आपला सगळासना सहकार्यखाल हातात घियेल शे. त्यावातून गंजच साहित्य, संशोधन, माहिती हातात येनार शे. ते सगळं आदिवासी आनि बाकीना सगळा लोकसपावत येगयेगळा रूपमा पोचाले पाहिजे. कारन त्यानामुळेच समाज

'परिवर्तन' घडी येवानी खात्री दखास. त्याकर्ता त्यानं प्रकाशन व्हवाले पाहीजे. वितरन व्हवाले पाहीजे. सध्या भारतमा ज्या प्रकाशन संस्था शेतीस त्या मदत करतीनबी. पन शंभर टक्का हायी कार्य येक चळवळ म्हनीसन ह्या प्रकाशनन्या संस्था राबाडतीनच आशे नही. भाशा केंद्रनी समाज 'परिवर्तन' कर्ता संस्कृती, भाशा, इतिहास यासना बद्दल तयार व्हनारी माहिती सर्व समाजना लोकसपावत धाडाकर्ता आपली प्रकाशनसंस्था सुरू कराना निर्नय घियेल शे. २४ सप्टेंम्बरले ह्या इशयवर बडोदाले चर्चा घिदी व्हती. लवकरच भाशा प्रकाशन पूर्न रूप घी. तशे पाह्य ते 'ढोल' हायी ह्या प्रकाशन संस्थाना पायाच शे.

आदिवासीन्या समृद्ध प्राचीन परंपराना अभिमान करता करता त्याना आजना वर्तमानकडे डोकेझाक करामा काहीच अर्थ नही. आजना आदिवासी येकते जंगलमा पाडासवर निराश व्हयी बशेल शे. नहीथे गावमजारला तुटपुंजा उत्पन्नवर भागत नही म्हनून शहरकडे धाई राह्यना. शहरसमजारला रस्तासना, इमारतीसना बांधकामवर माल देवाकर्ता, खडी फोडाकर्ता तो सगळीकडे 'उपलब्ध' शे. तो आपलं शरीर इकी ऱ्हायना आनि रातले रस्ताना काठले, कचरापेटीना बाजूले पडी ऱ्हास. आशा आदिवासीसनं समोर संस्कृतीन्या बाता मारनं म्हनजे नुसता बकवास. पन थोडसं बोलं तरी ध्यानात येस, मांगे ठी इयेल ठेवा त्यानी आजूनबी मनात जपाडी ठियेल शे. म्हनून थोडसं निमित सापडताच तो आपला गावले जायी येस. शहरात येताच तो मुळ उखडेल अवस्थामा वेठबिगारीनं जिनं जगी ऱ्हास. येकटा बडोदा शहरमा ६० ते ७० हजार आदिवासी मजूरीकर्ता इयेल शेत. यासनापैकी बहुतेकसना आपला मूळ गावशी सबंध जवळ जवळ तुटेलनागतच शे. आनि शहरमाते त्याले कुठेच जागा नही. बाकीना कित्येकजन ते 'स्थलांतर' करनारा पाखरसनागत मोसममा आपला गावले जाई येतंस आनि कामना मोसममा शहरात यी ऱ्हातंस. पन ह्या कोनीच शहरना रहिवासी म्हनीसन कागदोपत्री येत नहीत म्हनून त्यासले कुठेच जागा मिळत नही. याकर्ता काही करवा आशे वाटंस आनि म्हनून बडोदा शहरमजारला काही विचारी मित्रसनी मदत घीसन भाशा केंद्रनी 'चौथरा' हाऊ कार्यक्रम करानं ठरायेल शे. बडोदा शहरमा आदिवासीसले येक करीसन, त्याले बोलतं करानं, आनि त्याले त्यांन भावविश्वबी परत मिळाइ देवानं, आशा कार्यक्रमले आठे दिवसेंदिवस चांगला प्रतिसाद मिळी ऱ्हायना.

ह्या सगळा उपक्रमसबद्दल मोठा आवाजात आज सांगानं कारन आशे शे, यावातला बराच उपक्रम 'स्थानिक' पातळीवर चालू शकनारा शेतंस. आदिवासी जीवनमा 'आमूलाग्र' बदल घडायी आनना व्हयी आनि तोबी त्याना मुळं त्यानीच मातीमा घट्ट रूइ ठीसन, ते यासना सारखा उपक्रम जागोजागे हातात घेनं गरजनं शे. येगयेगळा आदिवासी भागसमा आशा कार्यक्रम स्थानिक आदिवासी कार्यकर्तासनी हातात घेवाले पाहिजेत. 'चौथरा' आनि 'बचती पाडा' ह्या जर गावोगाव आनि शहरसमा सुरू जयात ते बागे बागे आपापला गावसमा त्या समाज बदलना केंद्र व्हव्हू शकतीन. त्यानामुळे आगोदर सांगं तशे आदिवासी सवताले खूप 'सक्षम' आनि 'स्वयंपूर्ण' समजाले लागयी.

आगस्ट १९९८ ना 'ढोल' ना अंकमा 'भाशा केंद्र' ह्या लेखमां डॉ. गणेश देवी यासनी लिहेल व्हतं, भाशा केंद्र म्हनजे फक्त बडोदा आनि तेजगड आठे वशेल एक संस्था नही, तशेच सरकारी खातं नही. भाशा केन्द्रले सरकारनं अनुदानं मिळत नही. मना मते, भारतना अनेक प्रांतात पसरेल मन्हा असंख्य सहकारीसना मनात, आदिवासी प्रजाबद्दलना जिव्हाळा म्हनजे भाशा केंद्र. हायी केंद्र एक नवा विचार शे, नवी चळवळ शे. ढोलना संपादक, त्यामा लेख लिव्हनारा आनि त्यासनं वाचन करनारा ह्या सगळाच त्या चळवळना कार्यकर्ता शेतंस. आशा सगळा कार्यकर्तासना संघ म्हनजे भाशा केंद्र, आनी ढोल या चळवळनं मनोगत शे. हाऊ आशय ध्यानमा घिसन भाशा केंद्रना वर सांगेल उपक्रम सगळीकडे कराकर्ता भाशा केंद्र सगळासले 'आवाहन' करी ऱ्हायनं. ज्यानामातून खूप वरीसपशी चालत इयेल अत्याचार, अन्याय आनि कोनीच दखल घेत नही म्हनून मुका बनेल आदिवासीले आपला चेहरा आनि आपला आवाज आखो परत मिळना, ते 'भाशा'ले आपला नावनं चीज जयं आशे वाटयी. O

# भिल : येक नोंद

नगीन राठवा

*श्री नगीन राठवा ह्या 'तेजगढ'ले 'भाषा संशोधन केंद्र' नी शाखा चालाडतंस आनि आदिवासीसना सक्रीय कार्यकर्ता शेतंस. छोटाउदेपुर भागमजारला भिलस्नी जानकारी, त्यासनी आठे आपलाकर्ता लिहेल शे.*

### भिलसनी उत्पत्ति :

भिलसनी उत्पत्तीनी बारीमा काही तरी ठळक सांगनं अशक्य असनं तरी ती येकदम जुनी जमात शे. त्यावात हायी मागताईन इयेल अनेक परकारन्या जातिसना संपर्कमा येत ऱ्हायनी. ह्या सगळा कारनसमुळे 'भिल' नावधरी वळखला जानारा सगळाच समुहमा येकसारखा तत्व आनि गुन दिसतं नहीत.

भिल हाऊ शब्द मुळ द्रविड भाषाना बील (Bille) ह्या शब्दवरथून इयेल शे. भिल जुना जमानापशी सवताजवळ तिरकामठं ठेवत वनात. बील ह्याना अर्थच बान आशा व्हस. त्याना अर्थ 'कापनं' आशाबी व्हस. बील शब्द पशीनच भिल शब्द तयार व्हयेल व्हयी आशे वाटंस. नुसता ह्या नावना आधार घीसन त्यासना इतिहास पाह्याते कोनी तामिळ साहित्यमा तर कोनी संस्कृत साहित्यसंगे संबंध ठीसन शेतंस. ह्या सगळ्या गोष्टी पाह्यात ते त्यावरथून आशे म्हनता येस की ह्या भिलं खुप जुना काळपशी पृथ्वीवर शेतंस. गुजरातना इतिहासमा त्यासना काही ठिकान उल्लेख दखास. त्याना परमाने रजपूत राजा (राजवाडे) आनि मोगल राजाससंगे भिलसले बराच येळ संघर्षमा पडनं पडं व्हतं. हायी गोष्टनी नोंद घेवाले पाहिजे. *राजपूत आनि मोगलसले भिलसनी मदत घेनी पडनी व्हती आनि त्याना मुळेच त्यासना येकमेकसंगे समाजसंबंधबी* सुरु व्हयना व्हतात. भिलसले सवतानं 'आस्तित्व' करता पहिले रजपूत, मोगल नंतर इंग्रज समोरबी आवाज उठाडना पडा व्हता.

गुजरातमा मोगलसनं आक्रमन जये तव्हळ रेवाकांठ (नर्मदा नदीना काठना भाग) मोगलसना ताब्यामा वना आनि चांपानेर महम्मद बेगडाना हातात गया. तव्हळपशी सुरु व्हयेल संघर्ष १७ वा शतक पावत चालूच ऱ्हायेल शे. ह्या काळमझारच नर्मदाना दक्षिन भागमा बराच भिल मुसलमान व्हयनात. गुजरातमझारली 'ईडर' राज्यमझार राजगादीवर बसानं येळे भिलना हाते राजतिलक लावानी रित बाप्पा रावळसना काळपशीन सुरु व्हयेल दखास. महाराष्ट्रमझारला तडवी भिल मुसलमान धर्म पाळतंस. हाऊ खरं ते त्यासना मुसलमाननसंगे इयेल जवळना संबधसनाच परिनाम शे.

### भीलस्ना घरनी अवस्था :

भिलसन्या वसाहती सुट्या सुट्या ऱ्हातीस. मळातला घरस्ना माळेक त्यासना घरं ऱ्हातंस. ह्या घरस्ना राखननी जबाबदारी मळाना मालकनी ऱ्हास. बहुतेक मळा येकच घर बांधतंस. जर दोन-तीन भाऊ व्हतीन तर त्या शेजार शेजार ऱ्हातस. हायी पध्दतखालच घरस्ना येक समुह तयार व्हस. भिलस्ना घर मळासमाच ऱ्हातंस. येक घरातला पोरगा मोठा

जया का तो येगळा निंघीसन सवतानं घर त्याच मळामा बांधस. त्यामुळे येकच कुटूंबना पाच पाच सहा सहा घरस्ना झुबक दिसतंस. त्यासना जवळच त्यासना मळा ऱ्हातंस. बहुतेक ठिकान येक बापना सगळा पोऱ्यासनी सेती येकत्रच ऱ्हास. म्हनजे या घरस्ले येगयेगळा चुलस्ना घर म्हनता यी. अशा परकारे त्यासनी घर येवस्था येक समाज संघटन घडावस. येक बापनी मालकी शेतीमा सगळा भाऊ घरं बांधीसन ऱ्हातंस.परतेक गावमा आशा परकारना पाच ते आठ झुबका पावाले मिळतंस. सगळा येकच गोत्रना ऱ्हातंस. नयीतवळ येकच वंशना घरंस्ना झुबका पावाले मिळतंस.

**भिलस्ना घरनी बांधनी :**

भिलस्ना घरं माटी, टोकर नयी ते तोरना सातवरी बांधतंस. घरमा येक पट्टा आनि वसरी ऱ्हास. घरनापुढे ढोरं बांधाले लाकुडन खोपटं बांधेल ऱ्हास. छप्पर सारीसन कडतं खारपाननं (तंबाखुना वळायेल पानं) नयीते सागना पानं पसारी झाकेल ऱ्हास. घरमा चुल, घट्ट्या, परास पल्थ, लाटनं, सूरी, तवा, सुपडं, बादली, टोकरन्या टोपल्या आनि आंथरून ऱ्हास. घरनां बाहेर पानी ठेवाकरता लाकुडना माया बनाडेल ऱ्हास. त्यासनावर माटीना मडका ठियेल ऱ्हातंस. तुंबडाना डोयाबी त्यानां जवळ ठीयेल ऱ्हास घरमा तूप-दुध ठेवाकरता शिकासारख्या कोठ्या ठियेल ऱ्हातीस. तलवार, भाला, बंदूक, तिरकामठं, मासा पकडानं जाळं, टोकरना झाकारा, घारीय, कोरे भितीसले लटकायीन ठियेल ऱ्हातंस. खाट, चिलीम, दारूना बुदला, तोडलं लाकडं, कोऱ्या वस्तु घरना कोपराले ठियेल ऱ्हातीस. घर बांधान येळेस नातेवायीक, शेजारी-पाजारी मदत करतंस. भिल तिरकामठाना वापर सवताना रक्षनकरता करतंस. पन त्यावरी त्या कोनले मारतं नयीत. तिरकामठावरी मळानी राखंनबी करतंस.

**भिलस्ना पेहराव :**

भिल दाद्या मानूस पातळ कपडा वापरतंस. डोकावर पट्टापट्टानी नी ढवळी पागोटी बांधतंस. ज्यानामुळे डोकाना मझारला टाळुना भाग उघडा ऱ्हास. वर सदरा आनि त्यानावर काळा रंगनी बंडी घालतंस. तीनावर ढवळा दोरावरी गोल फुलं काडेल ऱ्हातंस. खाल परमपरानी पध्दतनुसार धवळं धोतर नेसतंस. काही भिलस्नी खास अशी बाह्य वळख शे. रूप्यानी कानातली कडी, मरफिय, सेलकड्या, कंदोरा, खजिसात बटनस्नी साकळी आंगठी अशा दागीनाबी घालतंस.

बायीसना पहेराव मोठा घेरना परकर, व्हडनी आनि चोळी अशा ऱ्हास. परकरले नांदडा आशे म्हनतंस. त्यावर आंबानी डिझाईन ऱ्हास. या परकरले त्यासना मुख्य पेहराव समजला जास. ज्यासना घेर जास्त मोठा ऱ्हास त्या परकर नउवारी लुगडा सारखा दोन्ही पायसमझारून कासरा घीसन नेसतंस. अशा परमाने परकर घालाले दोन्ही पाय मोकळा ऱ्हातंस. भिल बायासले दागिनास्ना भयान शोक ऱ्हास. हातं आनि पायसमाते किलो-दोन किलो वजननाबी दागिना घालतंस. बांगड्या, कडी, हासडी, पायस मजारल्या साखळ्या, आंगठ्या, जोडवी, माहेरनं पायल कडं (पावनेया) आनि कोरा दागिना भिल बाया मोठी आवडखाल घालतीस.

उलल्ला पोऱ्या उघडाच फिरतंस. थोडंसा मोठा जया का मंग लंगोटी घालतंस. पोरी नउवारी सारखा परकरना कासटा घालीसन वडनी आनि पोलकं घालतीस. नवीन लगन व्हयेल पोर भांगमा कुकु भरस. हायी तीनी वळकच ऱ्हास. बाया आंगवर गोंदी घेतीस नि केसंबी निरनिराळा परकांरे गुंफथीस.

**भिलस्ना आहार :**

भिलसना आहारमा मकायी, कादेरी, बंटी, चना, उडीद, तोर, तांदूळ, कारक ऱ्हातंस. गाया, म्हैस आनि बकरीन दुध, दही, ताकबी खातंस. हारन, ससा, कोंबडा, बोकड्या, कोला, तितर, मासा यासनं मांसबी खातंस.

भाजीपाला आनि कंदमुळंबी खातंस. चहा, तंबाकु, बीडी, हुक्का पेतस. दारुबी भरपुर पेतस. भिलमा हरोपीओ(दारू पेवानं) म्हनजेच साखरपुडा आशाबी अर्थ व्हस. सामाजिक आनि धारमिक उच्छावसमा दारूले महत्व नारळ इतकंच शे. भिलसमझार परतेक कामनी सुरुवात दारूवरीच व्हस. हंगायीपुरळी म्हनजे लगन नयीते लगन ठरावनं अशा अर्थ व्हस.ह्या परकारे हरो (दारू) नी भुमिका येकमेकसंगे संबंध जोडनारी आनि धारमिक उच्छाव मजारली महत्ववनी शे. म्हनून भिलसमा आजबी हायी दारू कायी कमी व्हयेल नयी. भिलसमजार आशी मान्यता शे, जर लगन नयीते साखरपुडा नाकारा, तरच दारू सुटाले पायजे. म्हनून साखरपुडा नयीते लगन टाळता न येनारं ऱ्हावामुळे दारूबी टळत नयी. दारूले भिलसनी सवाताना जीवनमा आनि संस्कृतीमा पक्क चीनी घीयेल शे.

## दैनिक जीवन :

भिल समाजमा पहाटले लवकर उठीसन घरातली सासु नयीते सुन ह्या जोडीसन रोजनं दळन करतंस. तांदूळ पाखडतंस. यासनामा रोजनं धान्य रोज दळाना रिवाज शे. हायी जयं का मंग पानी भराले जातीस. सुनासले याळभरमा दोनदा दळनं पडंस. सकाळीसना जेवन करता पहाटे आनि रातना जेवन करता दुपारले आशे दोन येळे दळतंस. घरना कामसमा बायीसले जास्त दमनं पडंस. त्यामुळे बाया कामासमझारून मोकळ्या काही व्हती नयीत. तीसलेच मळामझारलं तन ढोरस्ना चारा, सरपननं लाकुड, रांधनं, पोऱ्या संभाळना आनि दुपारले नवराले जेवन घी जानं अशा कामं करना पडतंस.

दाद्या मानसं सकाळीज लवकर उठीसन जनावरस्ले चारा टाकतंस. तोंड-बींड धुतंस आनि सकाळीसनी न्यारी करीसन मळामा गयातका ते संध्याकाळेच येतंस. उलला पोऱ्या आरामात दमखायी उठतंस. तोंड बिंड धुयीसन न्ह्यारी करी ढोरं चराले घी जातंस. त्यासना सायी थोडाला मोठला आयीबापसले मदत करतंस. हायी पध्दतखाल भिलसना दैनिक जीवनमा वय परमाने आनि लींग परमाने कामनी वाटनी व्हयेल ऱ्हास. त्याच परमाने नातासंबंध बी ऱ्हातंस.

## भिलसले घातकी समजतंस :

भिलसले क्रुर आनि घातकी समजतंस. पन हाऊ समज चुकिना शे. भिल सवताना रक्षन करता तिरकामठं, तलवार नयीते आळीये जवळ बाळगतंस म्हनून त्या चोर शेतंस आशे मानी पोलीस त्यासले धरी घी जातंस. आनि मार मारीसन कोंडी ठेवतंस. पन खरं वास्तव येकदमच येगळं शे. तिरकामठं त्यासस्न मुख्य साधन शे. आनि ते त्या हमेशा जवळ बाळगतंस.

लोक भीलस्ना संशय घेतस ते चूकिनं शे. त्यासनी बारीमा चांगला खोलवर यीचार कराले पाह्यजे. आपला देस स्वतंत्र करामा भिलस्ना चांगला मोठा वाटा शे. त्यासनी शक्तीमुळेच आपला देशनी परगती व्हयी ऱ्हायनी. इंग्रजसना समोर त्यासनी आपला तिरकामठावरी लढत दीधी. आपला देस स्वतंत्र करामा भिलस्नं मोठं योगदान शे. आशा हाऊ भिलसमाज आजना चोर डाखु समजला जास. भारत देश टिकाडी ठेवामा त्यासनाबी हात शे. शेतीमा काम करीसन धान्य पिकाडीसन ते आपुले पुरावतंस. आपु त्यासनं आन्न खादं का मग आपुन यीचार कराले पाह्यजे की त्या कितला मोठा शेतंस आनि आज त्यासले जगाना अधिकारच नही. त्यासना करता सरकार योजना राबाडस. पन ते त्यासना पावत पोचतंच नही. योजना मजारच कुठेतरी अटकी पडंस. आनि भिलं मागासेलच रहातंस.

## भिलसन्या समस्या :

आदिवासी भिलसमाजना शिक्षननं परमान येकदमच कमी ऱ्हावामुळे त्यासले पावलोपावली नुकसान सोसनं

पडंस. बसमझार सुध्दा त्यासना पशी भाडापेक्षा जास्त पैसा घेतंस. सरकारी दवाखाननासमा सुध्दा पैसा न घेता सेवा कराना नियम ऱ्हायीसनबी त्यासले थोडाफार तरी पैसा चुकाडनाच पडतंस. पोलीस त्यासले गन्हेगार समजी धरी लयी जातंस. गुन्हा दुसरा मानुसनी करेल ऱ्हायनातरी त्या गुन्हानी कबुली मारीझोडी त्यासनापशी करी घेतंस.

हाऊ समाज ऱ्हातानहीते भारत देस टिकना नसता. त्याले कारन म्हनजे शेतकरी धान्य निबनच कमी भावमा यीकतंस. हाऊ समाज आशा शे तो सवता भुक्या ऱ्हायी दुसरास्न पोट भरस म्हनुनच त्या गरिब ऱ्हायलशेत. या समाजमा शेतीकला फक्त पाऊसना पानीनाच आधार ऱ्हावामुळे त्या पावसाळामा गावमा ऱ्हायीसनच शेती करतंस आनि नंतर शहरस्मा मजुरीले जातंस. आपला शहरातला रस्ता, घर, मोठल्या माड्या यास्ना घाममजारतूच उभ्या ऱ्हायेल शेतीस. त्याच घरना मालक त्यासले नंतर घरनाबाहेरबी उभं रांहु देत नयीत. आशे का बरं ? आपु ज्यानं खातंस त्यालेच यीसरी जातंस. या समाजनी जर शेती सोडी दुसरा काम करान ठराय ते भारतले उपाशी मरानी येळ यी उभी ऱ्हायी. या समाजमा परतेकलेच काम करानी हाऊस ऱ्हास. त्यासन्या येगयेगळ्या कला शेतीस. पन सध्या त्या सगळ्या दवडी गयात. वळायी गयात. ह्या वळावा मागेबी येक कारन शे. ते म्हनजे या कलास्ना विकास करता जे दाम मिळाले पाह्यजे तेवढा त्यास्ले मिळत नयी. सरकार कडतून अनेक उद्योगसना विकास केला जास पन त्याना लाभ या त्यास्नापावत पोचत यी. यानं मुख्य कारन आजना अधिकारी आनि राजकारन शे. भिलसले पाहिजे त्या परमानमा पानीनी आनि वीजनी यवस्था मिळत नयी तधळ तो पुढे कशा यी ? त्यासनावरला ह्या अन्यायमागे कोनी येकच जन नही. तो दुर करान परतेक भारतीयनं काम आनि नैतिक जबाबदारी शे.

आज भारतले स्वातंत्र्य मिळीसन पन्नास वर्ष पुरा जयात. पन हायी स्वातंत्र्य फक्त शहरस्मा शे. ते खेडापाडास्मा दिसत नयी. खेडापाडास्मा बेकार, सर्व बाजुसकडतीन मागासेल लोक शेतंस. याकरता आजुन राजकारनबी जबाबदार शे. इंग्रजसना शाशनकाळमा गरिब, हस्तकला आनि इतर उद्योग करिसन जगेत, त्यासना ह्या हातंच कापी टाकात. आनि त्यासले आशा हलका कामं करानी पाळी वनी. ह्या जातना नशीबमाच आशे व्हतं. तवळ अशा हाऊ समाज, ह्या लोकं परगती कशी करतील ? आजबी गावातली परिस्थितीमा काही फरक जानवत नयी. त्यासना कार्यस्करता पैसानी नदी वाव्हाडली जास पन ते त्यासना पावत पोहचाना आधीच आटी जास. हाऊ पैसा मग कथा गया, याना कोनी यीचार करयी का. आपन जे कायी पैरतंस त्याले फळ येवापावतनी जबाबदारी सरकारी अधिकारीस्नी ऱ्हास. पन हायी गोष्ट त्यासले समजत का बरं नयी ?

O



# सातपुडामझारला भिल्ल

सुभाष पावरा

***श्री सुभाष पावरा धडगाव-अक्राणीले प्राथमिक शाळा मास्तर शेतंस आनि 'ढोल' नी 'पावरी' आवृत्तीना संपादक. सातपुडा भागमजारला भिलसनं जीवन आनि त्यासन्या समस्यासनी बारीमा त्यासना विचार आठे त्यासनी लिहेल शे.***

नंदुरबार जिल्हानी उत्तर बाजूले सातपूडाना पर्वत रांगासमझार भिल्लसना परदेश शे. या पर्वतसमझार अनेक लहान मोठ्या नद्यासना उगम व्हत असना तरी तापी आनि नर्मदा ह्या दोन नदीसना खोरामझारला आजूबाजूना भागच भिलसना भाग म्हनीसन वळखतंस. ह्या भागना उत्तरले मध्यप्रदेश, पश्चिमले गुजरात, पूर्वले जळगाव जिल्हा ते दक्षिनले धुळा जिल्हा शे.

सातपुडाना जंगल आनि पर्वतना भागमाच नर्मदा खोराना परिसरमा अक्रानी आनि अक्कलकुवा तालुकाना भाग पसरेल शे. तापी खोराना पट्टामा नंदुरबार, शहादा, शिरपूर, शिंदखेडा, तळोदा आनि अक्कलकुवा ह्या तालुका शेतंस. यावात नर्मदा खोरामझारला तिसरी आनि चौथी रांगना भागातला आदिवासीसना विचार करेल शे. या भागात भिल्ल, पावरा, तडवी, पाडवी, गवाल, बोंडे, परमार, खिश्चन ह्या राहतंस. इठला भिलसले मिथवाडे भिल्ल म्हनीसनंच वळखतंस. पहिले आठे मिथवाड संस्थान व्हतं. इथला भिल्ल व पावरा समाज मुळ पावागड वरून इयेल शे. आशे इथला लोक मानतंस. भिल, पावरा लोके उचा, धडधाकट, काटक आनि गोरा शेतंस. हाऊ समाज व्यवहारितंशेच पन तो जमीन बाळगीसनबी शे. त्यासना मुख्य धंदा शेती आनि शेतमजुरीच शे. ह्याले पुरक यवसाय म्हनीसन त्या गुरंढोरंबी पाळतंस. त्या निसर्गमझारला देवंसनी पुजा करतंस. ह्यासना मुख्य सन दिवाळी, होळी, इंदल, गुवान ह्याच शेतंस.

ह्या आदिवासी जमातीसमा सवतान्या परंपरा शेतीस. संस्कृती शे. त्या सगळा निसर्गवादी शेतंस. निसर्गमझारली परतेक वस्तूमा शक्ती शे आनि तिन्हा बरावाइट परिनाम मानववर व्हतंसच आशे त्या मानतंस. त्यासनी संस्कृती येकदम साधी शे. बिनखर्चना भागतीन आशा वस्तूसवरंच त्यासन्या चालीरीती, हौसमौज आनि सन उच्छाव पार पाडला जातंस. त्यासना सन उच्छावसन येक महत्वनं वैशिष्ट्य म्हनजे त्यासना परत्येकच सन उच्छावले सगळं गावनं गाव सामुदायिक रितखाल एकत्र जमा व्हस. आशा येळेस नाच गानाना खुपनंच कार्यक्रम व्हतंस.

पहीले निसर्गमझारतून सहज मिळयी आशा अन्नसामुग्रीवरच त्या अवलंबीसन व्हतात. आत्ते आत्ते आधुनिक तंत्रज्ञानना त्यासना जीवन संगे संबंध येवाले लागा. त्यासमा काही शिकेलबी शेतंस. काही भागमझार पानीना पंप, विज आनि रस्तासनी सोय व्हयी राह्यनी. तरीबी काही अतिदुर्गम भागमा आजूनबी कोनत्याच सुविधासनी सोय व्हयेल दखात नही.

या आदिवासीसमा दहेज, म्हनजेच वधुमुल्य(हुंडा), घरजवाई, गंधर्वविवाह, विधवाना विवाह, येकसाइ जास्त बायका ह्यासारख्या प्रथा शेतीस. दहन आनि दफन ह्याबी विधी आढळतीस. बाया चांदीना शिक्कासना हार गळामा

घालतीस. तशेच आसडी, वाडे, पायात तोडा घालतिस. हातसमा चांदीन्या, काचन्या बांगड्या घालतिस.

सातपुडाना आदिवाससना धार्मिक आनि समाजिकच कार्यसना पुजाविधी पुजारीकडथाइनच करतंस. त्यासना धार्मिक विधिमझार पुजारीले महत्वनं स्थान ऱ्हास. त्याले दैवी शक्तीसनं ज्ञान ऱ्हास आशा त्यासना समज शे.

आदिवासीसना देवदेवता झाडं, पशू, दगड ऱ्हातंस आशे म्हनतंस तरी परत्येक गावमझार देवदेवतासनं स्थान येगयेगळं ऱ्हास. त्यासना देवसनी कथा मौखिक स्वरूपमाच ऱ्हास. राजाफांटा, गाडाठाकूर, याहामोगी, बागोऱ्या, दोध्यावजीर, अस्ताबा, कुभाटा, कुदूराना, भिलट, रानीकाजल, आहलमाळी, आयखेडा, गांडीदिवाली, करहन, निलचरी, वाघन, इरल, ऊपला, इंदीराजा आशा अनेक देवदेवतासन्या कथा मौखिक कथा आनि गानासमझारतून आढळतंस. त्यासनं राव्हानं ठिकान जास्त करी डोंगरसवरच ऱ्हास. कारन पूर्वीसले जलप्रलय व्हयीसन पृथ्वीवर दलदल व्हयी गयीथी म्हनून देवदेवता डोंगरसवरच ऱ्हावाले व्हत्यात आशे त्या सांगतंस. देवदेवतासना नावसपुढे राना, रावत, राजा, रानी आशा शब्दसन्या उपमा दियेल आढळतिस.

आदिवासी संस्कृती सगळीकडे सारखीच शे. मौखिक शे. येक तोंडकडथीन दुसरा तोंडमा, येक पिढीकडथीन दुसरी पिढीकडे ती न शिकाडता चालत इयेल शे. मौखिक लोकगितसमा आनि कथासमाच आदिवासीसना इतिहास सापडंस. ह्या गितसनी आनि कथासनी जपवनूक अनादी काळपशीन करत इयेल शेतंस. सुखदुखं ह्या गितसमझारथूनच कळतंस. ह्या सातपुडाना आदिवासीसनी संस्कृती आजूनबी टिकाव धरी ऱ्हायेल शे.

आदिवासी जंगलना जवळ ऱ्हावामुळे त्याले लागनाऱ्या सगळ्या वस्तू तोच तयार करंस. त्याले, शेतीकरता लागनारा अवजारं, सयपाकन्या वस्तू, बैलगाडी आशा सगळ्याच वस्तू तयार करता येतीस. या काळात जंगल नष्ट व्हवाले लागामुळे त्याले अनेक अडचनीसले तोंड देनं पडंस. त्याकर्ता जंगलनं रक्षन कराले पाहिजे.

डोंगराळ भाग ऱ्हावामुळे पाऊसनं प्रमान जास्त ऱ्हास. त्यासना घर उतरता छप्परना ऱ्हातंस. सागवानी लाकुड, बांबूना कुडंबी लायेल ऱ्हातंस. परत्येकना घरले कौलं ऱ्हातस. लाकुड, कौल तो सवताच तयार करंस. येक घरमाच ढोरसना गोठा आनि रांधानी खोली ऱ्हास. काही कुटुंबसना गोठा आनि रांधानी खोली येगळी ऱ्हास. ज्यासले शेत ऱ्हास त्या शेतसमाच झोपड्या बांधतंस. त्यासना घरं विरळ ऱ्हातंस ते पाडा-पाडासपशीन गाव तयार व्हस. त्यामुळे विजनी सोय, शाळा अंगनवाडीनी सोय करनं मोठं मुष्किल ऱ्हास. शासनलेबी सुविधा पुरावाले तरासच व्हस.

डोंगराळ भागसमझारली शेती चढउतारनी आनि हालखी पतनी ऱ्हास. म्हनून फक्त पानकळाना पानीवरच उत्पन्न निंघस. तिठे बर्टी, मोर, कोदरा, मका, जुवारी, उडीद जास्त परमानमा घेतंस. खरीपना हंगाम सरी जाताच शेतीना काळ उरत नही. आशा येळे उन्हाळामा महूफूलं, टोळंबी, चारोळी, आंबा, डिंक, मध, लाख यासनं उत्पन्न काढीसन पोट भरतंस. जंगल नष्ट व्हवामुळे ह्या उत्पन्ननं परमान कमी व्हयी गयं. हायी आर्थिक उत्पन्न बेभरवसानं व्हवामुळे त्या मजुरीकरता दुसरा भागसमा भटकत फिरतंस.

हलका दर्जानं उत्पन्न ऱ्हावामुळे त्यासले चांगला आहार खावाले मिळत नही. जुवारी, बाजरीनी भाकर, आंबाडीनी भाजी, आंबाडी फुलं, बिनतेलनं वरन आशे त्यासनं रोजनं अन्न ऱ्हास. मझार मझार मोर, भातनं जेवन ह्या करतंस.

आदिवासीसनं मुख्य करमनूकनं साधन म्हनजे नृत्य. त्याकर्ता त्या त्यासनी आवडपरमाने वाद्य तयार करतंस. ह्या वाद्य लाकुडना, बांबुना, दुधी भोपळाना ऱ्हातंस. लहानमोठा ढोल, पावा, थाळी, घांगळ, काही तंतुवाद्य ह्यासना बी त्या वापर करतंस.

डोंगराळ भागसमा काही जंगलमा गावं शेतंस. तठे रस्ता नहीत. पेवाना पानीनी सोय नही. इतरबी गावना विकासना काही काम व्हयेल नहीत. परत्येक योजना कराना पहीले वनविभागनी परवानगी घेनी पडंस. उदा. धडगाव ते तळोदा हाऊ रस्ता इंग्रजसनी कारकीर्दमझार सर्वे व्हयेल व्हता पन आजुनबी त्यानं काम आर्धावरच शे.

या भागना विकास न व्हवानं कारन लक्षात घिदं ते, ते म्हनजे दुर्गम भाग राहामुळे रस्ताच नहीथ. रस्ता न राव्हामुळे त्या भागतला गावसपावत सर्वच सुविधा पोसाडनं मोठं कठिन काम व्हयी जास. येककडे सरकार त्या भागमा विकास करता येकना अनेक योजनासनी घोषना करस, ते दुसरीकडे त्या पुऱ्या करामा प्रशासनलेबी तारवरली कसरत करनी पडंस. त्यावात आनखी सेवाभावनी वृत्तीखाल काम करनारा अधिकारी आनि कर्मचारीसनी संख्या येकदमच कमी शे. कर्मचारी वर्ग दुर्लक्षबी जास्त करस. त्यामुळे ह्या भागना विकास येकदमच मंद गतीमा व्हयी राह्यना. कर्मचारी वर्ग लाचार व्हयी जायेल शे. कार्यालयीन कामसले लाच देवाशिवाय कामं व्हतं नहीत. महिना दोन महिना फिरीसन कट्टाळा येस. त्यामुळेच ह्या भागना विकास थांबी जायेल शे.

अक्रानी, अक्कलकुवाना दुर्गम भागमझार येकबी प्रकल्पन काम नही. ह्या भागतला जंगल आनि खनिज संपत्तीना विचार कया ते गावठी आंबाना झाडं मोठा परमानात शेतंस. आदिवासीनी ती खाजगी मालकीनी संपत्ती शे. त्या आमसुल तयार करीसन छोटला व्यापारीसले इकतंस. ह्या व्यापारी आदिवासीसना माल माती मोल भावात ईकत घेतंस. हायी स्थिती लक्षात घेता जर आंबाना चिपाडापशीन आमसूल, लोनंच तयार कराना मोठा उद्योग उभा कया ते आदिवासीसनाबी खुपच फायदा व्हयी.

आशाच परकारना भुईमुंग, महू, चारोळी आनि सीताफळ ह्यासनावर प्रक्रिया कराना मोठा उद्योग सुरु करता यी.

ह्या डोंगराळ भागमा वाहतुकन्या साधनसना अभाव, दुषितपानी, आहार ह्यामुळे कुपोषननी मोठी समस्या शे. त्यामुळे दरवर्षले खुपनच पोऱ्या मरी जातंस. उदा. बामनी, खडकी ह्या गावसमा मोठा परमानात बालमृत्यू जयात. हायी थांबाडाले पाहीजे. आशी येळे सगळा समाज बांधवसनी मदत कराले पाहिजे.

या भागमझारला ३३ गाव नर्मदा प्रकल्पना सरदार सरोवरमा बुडतंस. ह्या गाव धरनमा बुडाले नकोत, तठला आदिवासीसले तठून उठाडाले नको पाहिजे आगोदर त्यासनी दुसरी चांगली जागावर सोय लगाले पाहीजे ह्या महत्वन्या मागन्यासकर्ता नर्मदा प्रकल्पना विरोधमा लढनाऱ्या मेधा पाटकर ह्यासन्या मागन्या पुऱ्या जया नहीत हाऊ आदिवासीसवरला मोठा अन्याय शे. त्याकर्ता आंदोलन, मोर्चा चालू शे. हाऊ अन्याय दुर व्हवाकर्ता सुशिक्षित शिकेल सवरेल आदिवासीसनीबी मदत कराले पाहिजे.

आदिवासी सातपुडा शिक्षन प्रसारक मंडळ धडगाव तालूका आनि जिल्हा नंदूरबार हाई संस्थानी स्थापना १९६३ मझार जयी. पश्चिम खानदेश भिल्ल सेवा मंडळनी प्रेरनामुळेच संस्थानी स्थापना जयी. संस्था उबी करामा परमूख वाटा श्री. जनार्दन महाराज वळवी ह्यासना शे. हायी संस्थामुळे शिक्षनपशीन दुर राहेल आदिवासी पोऱ्यासनी चांगलीच सोय व्हयी जायेल शे. धडगाव परिसरमा हायी संस्थानी शिक्षननं चांगला मोलनं कार्य करेल शे.

O

# राठवासविशयी

सुभाष ईसाई

***श्री सुभाष ईसाई ह्या गुजरातमजारला छोटा उदयपूरले इंग्रजीना प्राध्यापक शेतंस. आनि त्या 'ढोल' नी राठवी आवृत्तीना संपादक शेत. छोटाउदयपूर विस्तारना राठवा भिलसनी बारीमा आठे त्यास्नी माहिती दियेल शे.***

छोटा उदेपुर हाऊ डोंगराळ भाग ऱ्हावामुळे त्यानं पुर्वीसनं नांव 'पाल' आशे व्हतं. आते हाऊ भाग 'पाल' म्हनीसन नही ते 'राठ' म्हनीसन ओळखला जास. ह्या भागले 'राठपरदेस' आशे नाव पडामागे तशा भयानक कारनं शेतंस. हाऊ सगळा परदेस नद्या, डोंगर आनि जंगलना शे. सातपुडा आनि विंध्य पर्वतन्या टेकड्या आनि जंगल यासवरी हाऊ भाग पुरा भरेल शे. सातपुडाना डोंगर नर्मदाना उत्तरकाठपशीन छोटा उदेपुरपर्यंत पसरेल शेतंस. विंध्यना डोंगर मध्यप्रदेशनी मावळतीपशी छोटा उदेपुरनी उगवतीपर्यंत 'रतमाळ' ह्या नावधरी वळखला जातंस आनि त्याच डोंगरं पुढे बारिया आनि त्यानापुढे पावागडपर्यंत पसरेल शेतंस. ह्या भागात राठवा लोकं राहतंस म्हनुन ह्या भागले राठपरदेश आशे नांव पडेल शे.

मुंबई गॅझेटियर (१८२५) मझारली नोंद परमाने राठवा लोकं मध्यपरदेशमझारला अलिराजपूर जवळला राठपरदेसातुन गुजरातमझार वनातं. त्यामुळे ह्या परदेसले राठ नांव पडनं. अलिराजपुर हाई राज्य पाच विभागसमिळी बनेल व्हतं. त्यापैकी येक भाग 'राठ' नावधरीच वळखला जाये. हाऊ विभाग छोटा उदेपुरले जोडीसनच व्हता. पुढे-पुढे हाऊ परदेस गुजरातमझारच सामाई गया आनि तठे राहनारा लोकसले राठवा हाई नाव पडनं.

ह्या परदेसमझारल्या नदीसपैकी ओरसंग हाई नदी परमुख म्हनता यी. तशाच अखोसारख्या काही छोटल्या नद्याबी शेतीस. जवळ जवळ १५० कि.मी लांबीनी ओरसंग नदी छोटा उदेपुर परदेस मझारली सगळात मोठी नदी शे. तिनाविषयी येक पुरानकथा बी शे. व्यासना पोऱ्या शुकदेवले कीटमझार असतांनाच ऱ्यान मिळनं व्हतं. त्यानानंतर तो वारेसकटच धरतीवर जन्मले वना आनि लगेच चालाले लगनां. ज्या रस्ताधरी तो ह्या वारेसकट चालत वना तठे हाई नदी बननी. म्हनुन तीले 'ओर (वार) संग' नाव पडनं. हाई नदी चांदोदजवळ नर्मदा नदीले मिळंस. ह्या डोंगरसपैकीच वाघस्थळ आनि टुंडवाना डोंगर आदिवाशीसले देवससारखा शेतंस. त्यासनी पुजाबी करतंस. यानामिळताच कोराज, काळियो, बोळियो, भरमो, ओरियो, ढोलियो ह्या डोंगरबी शेतंस. पुर्वनी बाजुकडे 'डोलोमाईट', 'लाईम' (चुनखढी), मार्बल (संगमरवर) यासन्या खानी शेतीस. त्यामुळे हाऊ परदेस खनिजसंपत्तीनी बारीमा समृद्ध समजला जास.

ह्या परदेसमझारला जंगलन उत्पादन बऱ्याच गरजा भागाडंस. लाकुड, मोहना फुलं, मोहन्या बिया, तेंदुना पानं, कौचाऱ्या बिया, लाख, डिग, गुंजा आनि काही वनौषधि ह्या परमुख उत्पादन शेतंस. त्यानाशिवाय ह्या जंगलमा आवळा, जांभुळ, टेंबरी, चारोळी ह्याबी भयान झाडं शेतंस. ज्यानावर गरिब आदिवासी त्यानंवालं पोट भरंस.

ह्या परदेसमझारला आदिवाशीसमझार राठवा, कोळी, धानका, नायका, भिल यासना समावेश व्हस. सगळासमा

राठवासनी वस्ती जास्त शे नही तव्हळ त्यामुळेच ह्या परदेसले राठवा परदेस म्हनतं व्हती. समाजना रितरिवाज, धर्मना उच्छाव आनि नवसमान्यतासनी बाबमा राठवा लोक आपलं येगळपन टीकाडी ठियल शेतंस. शहरी भागपशी दूर राहेल खेडापाडासमान आदिवासी राठवा आपलं नैसर्गिक जिवन जगी ऱ्हायनात. सामान्य किंवा मागाशेल म्हनवा तशे जीवन जगनारा लोकसनी समाजव्यवस्था व धार्मिक प्रनाली चकित करनारी गोष्ट शे.

राठवासनं पोट भरानं मुख्य साधन म्हनजे शेती आनि जंगलवरला उत्पन्न हाईच शे. बहुतेक गावसमा आदीवसीसनी सवतानी शेतजमिन शे त्यावात ह्या हंगामपरमाने पिकं,भाज्या पिकाडतंस. हाई शेतीमझार भात, मका, तुर, हांगरी यासारखं धान्य आनि उडीद, मुंग, मट, भुईमुंग, तिळी, कापूसबी पिकाडतंस. सवताले लागई तवढं ठिसनं बाकीनं ईकी काढतंस सवतानी जमिन नसनी ते मजुरी करतंस. महूना फुलं, बिया, तेंदुना पानं, कौचान्या बिया, लाक, डिग, गुंजा, चिचा, आवळं, बोरं, जामन, टेंबरीना फळ, चारोळी, लाकडं आशे काहीबाही गोळा करीसन ईकीसन त्या पोट भरतंस. ह्याच कष्टाळू आदीवासी आज शहरसमझार रस्ता आनि बांधकामवरला कामंसवर जातंस.

राठवासमझार आते आते शिक्षनन परमान वाढेल शे आनि त्या शाळा कॉलेजमझारला मास्तरपशी सरकारी कचेरीमझारला कारकुन, मामलेदारपशी कलेक्टरना पदपावत पोहचेल शेतंस. सरकारन्या येगयेगळ्या योजनासमुळे त्यासनं जिवनमान सुधरी ऱ्हायनं. शिक्षन आनि शहरना संबंधसमुळे त्यासनी मुळनी जिवनपध्दत आनि संस्कृती हळुहळू नाहीशी हुई राहीनी. तरीबी दुरवरला दुर्गम भागसमान जठेपावत शहरन वारं आझून पोहचेल नही तठे आजबी अस्सल राठवी जिवनशैली जिवंत ऱ्हायेल दखास.

## गावनी रचना

गावनी रचना येकदम साधी ऱ्हास. गावमा परत्येक जातनी येगळी आळी ऱ्हास तठे जातनी आळीले तिच जातना नावधरी वळखतंस. जशे सतिदा जातनी आळी सतिदा आळी ह्या नावधरी वळखतंस. नहीतव्हळं येखादा देवना नहीते झाडना नाव धरीबी वळखतंस. जशे बाबादेवनी आळी, चिच आळी. गावना वऱ्हल्यांगे ऱ्हायनं ते वरली आळी आनि खाल्ला आंगले ऱ्हायनी ते खाल्ली आळी म्हनतंस. परत्येक जातनी येक मुख्य आळी ऱ्हास. गावना टोकले गावंदर ऱ्हास. गावमा नहीते गावना भाहेर 'खत्री' देव ऱ्हास. गावमझारच बाबादेवनं ठाणं ऱ्हास. ह्या ठाणामझार परत्येक सनवारले गावना पटेल (पाटील) आनि बडवा (मांत्रीक पुजारी नही ते भगत) देवनी पुजा करतंस. माटीना घोडा, वाघ, उंट, धाबा (माटीन छोटं देऊळ) तठे ठेवतंस. लाकुडना घडेल खुट तठे रोवतंस. सनवारे हाई जागावर कोंबडं, बोकडं मारतंस. गावना गुरं ढोरं राखाकरता येक गोपाळ ठेवतंस, त्याले 'गोरी' म्हनतंस. गोरीले गांवना परत्येक घरमझारतून भाकर, पालं, शिदा देतंस. घरना मानसंबी ढोर चाराले जातंस. गावमिळी सगळासना येक सामाईक उखडा ऱ्हास. पानी भराले येक सामाईक येहर ऱ्हास. मळा सगळा गावना बाहेर ऱ्हातंस. मळासमानबी येहरी ऱ्हातीसं. काही दाव येक-येक आळी मिळीसनबी येहर ऱ्हास. साधारनपने गांव नदीना काठेच ऱ्हास. नदीले 'कोतेळू' (ओढा) आशेबी म्हनतंस.

## समाजरचना

गावातला सगळा वडिलधारा मानसं येकत्र ईसन त्या गावातला येक मानुसले परमुख म्हनीसन निवड करतंस. त्याले गांवना पटेल(पाटील) म्हनतंस. गांवना परत्येक झन ह्या पटेलले मान देस. गावना हरयेक बरा वाईट परसंगले सगळी येवस्ता पाव्हानं काम पटेलकडे ऱ्हास. गावना येक बडवा (भगत मांत्रीक) ऱ्हास. त्याले गावना धार्मिक गुरू समजलं जास. गावना परत्येक कार्यमझार त्यानी गरज पडसस. त्यावातच रोगराई ईयेल ऱ्हायनी ते पहिले बडवाच मंत्र म्हनीसन आनि घुमीसन रोगले पळावानं काम करंस. नवस फेडाना सगळा विधी बडवाच करंस. गांवात हाऊ विधी

कराले आजूनबी बडवा ऱ्हातंस.

गांवना येक पुजारा( पुजारी) ऱ्हास. पुजारा आनि पाटील मिळीसनच लगननं कार्य करतंस. होळी जागाडनं कामबी पुजारीच करंस. चुलाना नवसबी पुजारीच फेडंस. ह्या तीनी जन मिळीसन गावन्या आख्ख्या बऱ्यावाईट गोष्टीसनी काळजी घेतंस. गावना येखादा हरिजननी कोतवाल म्हनीसन नेमनुक व्हयेल ऱ्हास. तो पटेलना काममा मदत करस. गावमझार उच्छाव करना ऱ्हायना नही ते गावमा मयत जयं ते कोतवाल सगळा गावले खबर करंस. सगळं गांव येकजुटखालच ऱ्हास. गावना उच्छवसनी सगळी तयारी पटेल, बडवा, पुजारा आनि गावनी वडिलधारी मंडळी करंस. गाववर कोना हल्ला जया नही ते गाववर दरोडा पडना ते सगळं गाव येकत्र ईसन सामना करंस.

## घरनी रचना

घर येकदम साधी पध्दतनं बांधेल ऱ्हास. इटासवरी नहीते टोकर, तोरना धाटं, येकत्र बांधीसन वरथुन कुड बांधतंस आनि वरून शेनमाती लिपिसन भिंती बनावतंस. टोकरन्या कामट्या बांधीसन त्यानावर कौलं नही ते ताडना पानसनं छप्पर बनाडतंस. छप्परले दोन्ही बाजुसकडथीन उतार ऱ्हास. घरनामझार शेनमातीवरी सारवन करेल ऱ्हास. त्यानामा बाया गोल नक्षी (ओकळी) काढतंस. घर चांगलं लांब आनि रूंद ऱ्हास. पुढे वसरी करेल ऱ्हास. वसरिमाच पुढे लाकूडना खांब रूयेल ऱ्हातंस. त्यानापुढेच ढोरसनां गोठा ऱ्हास, त्याले कूड म्हनतंस. वसरिना मागे रांधानी खोली ऱ्हास. तीले येक खिडकीबी ऱ्हास. हाई खोलीमान भयान अंधार ऱ्हास. तीवातच सगळं सामान ठियेल ऱ्हास. येक कोपरामा चुलं मांडेल ऱ्हास. धान्य भरानी मोठी कोठी ऱ्हास तीले मोहठी नही ते मुसट्टी म्हनतंस. ती बाहेरून शेनमातीवरी लिपेल ऱ्हास. रांधाना भांडासमा भाकरी बनाडाना मातीना मोठा तवा ऱ्हास. त्याले ठिकरू (खापर) म्हनतंस. दाळ कालवन माटीनी हांडीमा नही ते तपीलीमा करतंस. हालावासाठी लाकूडना चमचा बनाडेल ऱ्हास त्याले चाटू म्हनतंस. मीरची समार वाटाकरता दगुडना खल ऱ्हास. दाळ वाटालेबी दगडच ऱ्हास त्याले लोदीयो (पाटा वराटा) म्हनतंस. वसरिना येक कोपरामा भात सडावाकरता गोल खड्डाना दगड (उखळ) जमिनमा बुंजेल ऱ्हास. भात सडावाकरताच मुसळबी ठ्यिेल ऱ्हास. वसरिमाच दळनदळाना घट्या ऱ्हास. धान्य, भाजीपाला ठेवाकरता छोट्या-मोठ्या टोपल्याबी ऱ्हातीस. त्यासले चारली म्हनतंस. घर झाडाकरता टोकरनी मोठी शिराई ऱ्हास. नही तव्हळ ती ताडना दांडापशीबी बनाडतंस. तीसले बाहडो नही ते बाहडी आशे म्हनतंस. शेतीकरता नागर वापरतंस. पिकं कापाले इळा वापरतंस. घरमा पाळीयु (कोयतासारखं मोठ हत्यार) आनि तिरकामठा ह्या हत्यारं ठियल ऱ्हातंस. पाळीयाना येकच झटकामा मानुसनं नही ते बोकड्याना माथा धडपशी येगळा व्हई जास. ह्या लोक तिर चालाडामा वाकबगार ऱ्हातंस. त्या येकदम दुरवरलं लक्षबी टिपु शकतंस. घरमार ढोल, तिही, पिही, कायमनं ठियेलं ऱ्हास. त्या सगळाना वापर लगन,जत्रा नहीते सनना येळे करतंस.

घर आईस-पइस ऱ्हास. मझार घुसासाठी येक बाजुले दार करेल ऱ्हास. दाराजवळ घरना बाहेर चार हात उचा लाकुडना माचा पानी ठेवाकरता करेल ऱ्हास. त्याले माळी आशे म्हनतंस. त्यावर पानीना दोन-तीन मडका ठियेल ऱ्हातंस. पानी काढाकरता तुंब्याना वापर करतंस. घरमझार सामान ठेवाले लाकुडना नहीते टोकरना माळा बनाडेल ऱ्हास. त्यावर चढाले लाकुडनी नही ते टोकरनी शिडी करेल ऱ्हास. वसरीमा येक कोपरामा नही ते रांधानी खोलीमा येगयेगळा येळे पुजा कराकरता लाकुडना खांब रुयेल ऱ्हास. त्याले खांबली नही ते धारनी बेडी म्हनतंस. घरना पुढली बाजुले खिडक्या राहती नहीत. फक्त येक दार ऱ्हास. त्याले कमाड नही ते कामेटू आशे म्हनतंस. घरमझारला मानसं जशाजशा वाढतस तशे तशे घरनी वसरी आनि मागली रांधानी खोली वाढावली जास. घर कितलबी मोठ जये तरी मझार जावाले येकच दार ठेवतस. घरना चारीबाजुले मोकळी जागा ऱ्हास. तिले वाडी म्हनतंस. पावसाळामा आठेच भाजीपाला लावतंस.

नवं घर बांधाआधी जागा नक्की कराले बडवाले बलावतंस. बडवा उडीदना दाना टाकीसन पुडी पहास आनि जागा चांगली शे का वाईट हाई सांगस. बडवानी सांगेल जागावर घर बांधतांना काही विधीबी करना पडंस. नवा घरनी बांधनीना विधी करता पटेल आनि बडवाले बलावतस. घरातली वडिलधारी मंडळी त्यासले मदत करतंस. घरातली येक कुवारी पोरले येर वर पानीभराले धाडतंस. तिनी पानी भरी आनल्यावर पटेल घडा उतारी घेस आनि ती पोरले सव्वा, सव्वा पाच नही ते सव्वा अकरा रूपया देस. जठे नवं घर बांधन ऱ्हास ती जागे हाई पानी वततंस. कुकु, तांदुळ आनि फुलं वाईसन दिवा लाईसन पुजा करतंस आनि पाया खंदीसन घर बांधाले सुरुवात व्हस.

बहुतेक सगळा राठवा येकत्र कुटुंबमा ऱ्हातंस. घरातला सगळा मानससनी संख्या २५-३० पर्यंतबी ऱ्हास. कुटुंबमा आजला, आजली, आई-बाप, भाऊ-भाऊजयी, चुलता-चुलती, पोऱ्या आशा सगळाज ऱ्हातस. कुटुंब मझारला सगळा जन वडील मानससना मान ठेवतंस. त्यासना सांगेल परमाने घरना येव्हार चालतस. दाद्या मानसं शेतीन आनि मजुरीनं काम करतंस आनि बाया घरनं काम करतंस. म्हातारं मानसबी पोऱ्या संभळान काम करतंस. सगळाज येकत्र ऱ्हावामुळे सगळासना संभाळ सगळाच करतंस.

## रोजना काम

सकाळीज लवकर उठतस. कोंबडानी बांग दिधी का सकाळीज जई आशे समजतस. नही तव्हल पहाटले चंद्रकडे पाहीसन बी येळ वळखली जास. थंडीमझार शुक्रना तारा पाहीसन येळ वळखतस आनि बाया दळनदळाले बसतीस. दळाना येळे गाना म्हनतीस. दळन झाल्यावर भाकरी रांधतस तव्हळच पालं बी बनाडतंस. मकानं पिठ आगला दिवस पानीमा मिठमिरची घालीसन गरम करी पिठलं तयार करास. त्याले राब आशे म्हनतंस. सकाळीज भाकरमेळता पालं नही ते दाळ खातंस. आनि हाई राब पेतंस. दाद्या मानसं बी लवकरच उठतस. तोंडबिंड धोईसन भाकर खाई औत-बैल घिसन मळामा जातंस. मजुरीवाला मजुरीले जातंस. बाया घरनं काम करतीस. गोठा कुड साफ करतीस. घर आंगन झाडीसन पानी भरतीस. दुपारले पालंभाकर घिसन मळामा जातीस. सगळा झन झाडखाल बशीसन जेवतंस. थोडा येळ इसावा घिसन दाद्यामानसं लगेच कामले लागतंस. बाया घर इसन संध्याकाळना जेवननी तयारी करतीस. संध्याकाळे दाद्या मानसं घर येतंस. गरम पानीवरी आंग धोतंस. सगळामेळी जेवनं करतंस. आनि गप्पा मारत बसतंस. गोष्टी कहान्या व्हतीस. हसाण्या इनोदी गोष्टीसले 'गप्पी' म्हनतंस. रातले लवकर झोपतंस.

## कमाइना साधनं

कमाईनं परमुख साधन शेती हाईच शे. जवळ जवळ सगळासनीच सवतानी जमिन ऱ्हास. ज्यासनी जमिन नसई त्या मजुरी करतंस. नही ते वनउत्पादनसवर पोट भरतस. शेतीसमा येगयेगळा पिकं व्हतस. मकी, तोर, भात, उडीद, जुवारी, कापुस, वगैरे. भाजीपालाबी करतंस. सवतापुरत ठिसन उरेल इकी टाकतंस. येगयेगळ्या परकारन्या जमिनिसमा येगयेगळा पिकं व्हतंस. जमिनना येगयेगळा परकार राहतंस. काळी जमिन 'मारवुं', बरड जमिन- 'काचलो', 'गोराळू', 'टेकरु' वगैरे परकार राहतंस. जशी जमिन ऱ्हाईनी तशी शेती करतंस. खास करीसन पानकाळी पिकं घेतंस. ज्यासकडे येहर ऱ्हायनी त्या हिवाळामाबी पिकं घेतंस. ज्यासनाकडे येहर नसयी त्या हिवाळी पिकसकरता ज्यानाकडुन पानी घेतंस त्याले पिंकना अर्धा वाटा देना पडंस.

## आहार आनि आरोग्य

आहारमान परमुख मकी, 'सामेल' नहीतं जुवारीन्या भाकरी आनि पालं नही ते उडीद नी दाळ घेतंस. मिरची/

तिखं भयान आवडंस. घरमान लाल मिरची, मीठ, लोसन आनि आलानी मिरची कायबी राहस. तिले 'तिखुं मीठुं' (तिखट मीठ) म्हनतंस. पालं दाळ नसनी ते भाकरवर निरह तिखटमिठ (मिरची/त्याना ठेसा) घीसन खातंस. उखड बशिसन डावा हातमान ताटली धिसन खातंस. नहीतव्हळ पळसना पानसवर घिसनबी खातस. सकाळीज आनि संध्याकाळे मक्याना पिठनी राब पेतंस. पालाले फोडनीकरता 'डोळा' (महुडानी बी) नं तेल वापरतंस. घरमान चापड्या (हातघाई तेल काडाकरता लाकुडनं बनाडेल वस्तु) घाई 'डोळी' न तेल काढतंस. घरमा पाढी व्हई तर दुध, दही, तुप खातंस. तुपले 'चोपड' म्हनतंस. कव्हळ-मव्हळ भात शिजाडतस. त्याले 'कोदरी' म्हनतंस. भोपळा येतंस तव्हळ भातमान भोपळा घालीसन शिजाडतंस. लगीनले नहीते कोनं मयत जयं ते तव्हळ त्याना बारावाले दाळभात करतंस. सनना येळे नही ते 'पाणगुं' ना येळे उडीदनी दाळना 'ढेबरे' (थाळीपिठ) करतंस. व्हळीना सनले सोळ्या-सांजोऱ्या करतंस. त्यावात मटन खानाराबी राहतंस. पाहुनापई वनात तव्हळ आनि सननायेळे कोंबडी खातंस. 'पाणगुं' मझार, व्हळीले आनि दसराले बोकड्या कापतंस.

जवळ जवळ सगळाज मानसं बिड्या पेतंस. सवतानी बिडी सवताच तेंदु/टिमरुना पानसपसुन बनाडतंस. घरमान टिमरुना पान ठेवतस. जवळना मोठा गावमझारून नही ते शहरमझारून मोकळी तंबाखु आनतंस. तिले भांग म्हनतंस. टिमरुना पान तोडीसन त्यामा भांग भरीसन बिड्या करतंस. पाहुना वनात ते त्यासलेबी पान (टिमरुना) आनि भांगच देतस. (व्हयलं बिडी देत नही) ह्या लोक नशा करानी बारीना शवकीन राहतंस. उन्हाळामा ताडी पेतंस. सगळासना घरना वाडामान नही ते वावरमा ताडीना झाड राहतंस. ताडीना पान मुळपशी कापीसन तिठे मडका बांधतंस. त्याले 'ढोचकी' नहीतंस 'पोक्यु' म्हनतंस. ताडीना पानं कापीसन मडका बांधतंस याले मडका शेकनं आशे म्हनतंस. घरमान लहानला-मोठला सगळा ताडी पेतंस. ताडी येस तव्हळ सगळा दिवसभर ताडी पिन तंद्रीमा राहतंस. जास्त खातबी नहीत. भुक लागनी का आखो ताडी पेतंस.

महुडाना (मोहना) फुलसनी दारू पाडतंस. दारूले 'हरो' म्हनतंस. 'पाणगु' मझार, लगनमा आनि सननायेळे सवता दारु पाडतंस. दारु गाळानं काम बायाच करतीस. येहरजवळ, खड्डामा पानी संघळेल व्हयी तिठे नदीनालामा, वावरात जठे पानी व्हयी तठे दारू पाडतंस. प्रत्येकना घरजवळ वरीसभर पुरई इतला महुडा (महुडाना फुलं) ठीयेल ऱ्हातंस. दारू पाडानी भट्टीले 'भांटी' म्हनतंस. येक मोठा मडकामा, ज्याले 'गोळुं' म्हनतंस, आंबेल, कुजेल महुडा आनि पानी भरतंस. पानीना जरासं वर चुलह पेटाडीसन त्यानावर मडकं ठेवतंस. मडकावर तवासारखं माटीन झाकन ठेवतंस, त्याले 'उंधा छत्युं', 'दाटियुं', 'बाबरु', म्हनतंस. माटीघाई लिपीसन तोंड बंद करतंस. बाजुले येक भोक पाडीसंन तिठे टोकरनी नहीते थोरनी पोकळ नळी बसाडेल ऱ्हास. तिले 'नळो' नहीते 'हरस्यो' म्हनतंस. नळीन येक टोक पितळना गुंडामा सोडीसन त्यानं बी तोंड माटीमा लिपीसन बंद करतंस. या गुंडाले 'देगडी' म्हनतंस. देगडी पानीमा ठियेल ऱ्हास. मडकामा महुडानी वाफ हुईसन नळीमझारून देगडीपत जास. देगडी पानीमा ऱ्हावामुळे हाई वाफ थंड हुईन तिनी दारू बनस.

राठवा आंगले बळवान आनि मेहनती ऱ्हातस. आंगवर जरासाबी मासकंड राहत नही. मानससनी उंची जवळ जवळ ५॥ फुट राहास. आनि बायासनी ५ ते ५। राहस. कष्ट करामुळे आंग बळकट आनि कशेल ऱ्हास. आजारी पडतास का बडव्याकडून (भगतकडुन) दावापानी करतंस. बरं नही वाटन का दवाखानामा जातंस. त्यासनामा सहनशक्ति जास्ती ऱ्हास. आंगवर किती बी लागेल जये तरी ते सोसतस. बान लागेल ऱ्हाव नही ते जंगलमझारला जनावरनी घायाळ करेल ऱ्हाव, चालान शक्य व्हई ते दवाखानाम लांब चालत जातंस. दुखस तरी सांगतंत नही. उगंमुगं सोसतंस.

## वेश

मानसं गुडघापावत धोतर नेसतस. काही झन कंबरले लंगोटी लावतंस, तिले 'कोहटी' म्हनतंस. कंबरले रुमाल/फडका परमाने धोतर नहीते शालबी गुंडाळतस. त्यानावर पट्टा नही ते करदोडा घालतस. वरतुन सदरा (आंगडा) घालतंस, त्याले 'चांखलुं' म्हनतंस. खांद्यावर पट्टी शिसन त्यावर गुंडी लावतंस. खाल्ली बाजुले दोन्ही बाजुसकडून तोडेल आनि तोडेलवर पट्टी शिसन त्यानावर गुंडी लायेल चाखला (सदरा) सगळासले आवडंस. आंगडाना पुढली बाजुले पट्टी शियेल ऱ्हास. आनि त्याले दोन्ही खिसा ऱ्हातस. डोकाले रुमाल नहीत फेटा बांधतस. कितला पोऱ्या झुबका-झुबकासना रुमाल बांधतस. डोळाना बाजुले गोंधेल ऱ्हास. त्याले 'कानचावणी' म्हनतंस. डावा हातवर नाव गोंधतस. हातमझार कडं घालतंस. त्याले 'भारियुं' म्हनतंस. दंडमाबी कड घालतंस, त्याले 'आमलियुं' म्हनतंस. ह्या कडा चांदीना ऱ्हातस. कानमा चांदीनी कंगरी घालतंस.

बाया गोल छिटासना परकर/घागरा नेशिन कासोटा घालतीस. वर लाल रंगनी साडी नेसतीस. तिनाबी घागराबरबर कासोटा घालतीस. आंगात फुगऱ्या बाहीसना पोलका घालतीस. ह्या भहु दागीनासना शवकीन ऱ्हातीस. गळामा जाडा चांदीना नही ते रुपाना नाणासनी 'हांसडी'(मोठा कडासारखा दागिना) घालतीस. त्यानी किंमत ३००० ऱ्हास. कानात चांदीना 'विंटला', लेरिया' नही ते 'टोकरिया' घालतीस. नाकात 'कांटो' (चुनी) घालतीस. दंडमान चांदीन्या 'बावडिया' (वेळा) घालतीस. पायमा चांदीन्या जाड्या अंदाजे ४०००रु. नी कडी घालतीस. आंगवर गोंधतीस. हातवर नाव लिव्हतीस. डोळासजवळ 'कानचावणी' आनि दाढीवर 'दीठी' गोंधतीस. पायना घोटावर, पोटरीवर 'आंबी' (कोयरी) गोंधतीस. टिकल्या, पावडर, लालीना भरपुर वापर करतीस. बारक्या मनीसन्या माळा, गजरा सवता बनाडीसन घालतीस. केससमा पलॅस्टिकनी फुलं, येण्या बनाउतीस. येनिसमान रंगीत रेभनी आनि लोकरन्या दोऱ्या घालतीस. गावमान कित्येक पोरीसना भांगमा सिंदुर भराना अर्थ माहीत राहत नही. त्यालेबी नट्टा-पट्टा समजीन कुवाऱ्या पोरी राहीसन भांगमान कुकु भरतीस. सननायेळे गालवरबी लाली चोळतीस वर 'जरी'(चमचम) लावतीस. तरुन पोऱ्यापोरीसले भडक रंग भयान आवडंस. लाल, हिरवा, पिवळा, निळा, केसरी, जांभळा, पोपटी ह्या त्यासना आवडता रंग शेत. ह्याच रंगना कपडा घालतंस.

## धर्म आनि रितीरिवाज

राठवा हाई जात हिंदुसमान मुडस. तरीबी त्यासना रितीरिवाज येगळा शे. बडवाना बोलामा (मंत्रसमान) हिंदु देवसन नाव येतंस. पन त्या पुजा त्यासना देवसनीच करतंस. 'खतरी देव', 'पिठोरा देव' नही ते बाबो पिठोरो, बाकटा देव नही ते बाबो वाकटो, टुंडवा देव नही ते बाबो टुंडवो, इंदराजा, झोटिंग देव, रतमाळ देव, ह्या देव राहतस. शहरी लोकसन शिकीसन हिंदु देव-देवतासलेबी त्या मानतंस.

राठवा जातमान काही पोटजाती पडतीस. येकच पोटजातमा लगन व्हतत नहीत. सतीदा, ओहरिया, कनाहा, बडोडिया, कटोलिया, मुडाळजा, धारवा, महाणिया, जमुरा, चगोडिया, माळिया, तळावेला, भाभरिया, लुहारिया, चुहाणिया, बामणिया, झांपलिया, बारिया, डोडवा आशा ह्या उपजाती शेतीस.

सगळा गावसमा खतरी देवन ठाण ऱ्हास,त्याले देव म्हनतंस. गावमझारला लोक दर वरिसले देवले कोंबडं, बोकडे देतस. मार नहीते गाववर संकट येस आशे समजतंस. पिक चांगलं नही येनं, गावमा रोगराई पसरनं, जनावर मरनं यालेज देवना कोप म्हनतंस. त्यामुळे देवले खुश ऱ्हावाकरता दरवर्षे बोकड्या, कोंबड्या मारतंस.

ह्या लोक भयान संशयी आनि अंधश्रद्धाळू ऱ्हातंस. घरमा आजारपना ऱ्हायना, शेतीमा निट पिक येत नसयी नही ते जनावर मरतं व्हतीन ते देवना कोप जया आशे म्हनतंस. अशा येळे बाबा पिठोऱ्याना नवस करतंस. पोरे आजारी पडन 'कुंवारिया' नही ते 'हमोनिया' ना नवस करतंस. भुतप्रेत, चेटुक सगळासमा इस्वास ऱ्हास. कोनताबी आजारले

भुतबाधा समजतंस. आनि बडव्यापसुन बडवाई (मंत्र उपचार) करतंस. बरं नही वाटनं ते दवाखानाकडे जास. 'डाकिनीन'(चेटकिनीन) नाव ऐकीसन थरथरतंस. रातन घरनाबाहेर निघंत नहीत. भुत पिशाच्ये, चेटकिनी रातन्या फिराले निंघतीस आशे मानतंस. गावनीच कोनतीतरी बाई चेटकीन शे आशे मानतंस. चेटकिन कोनताबी प्रानीनं रूप घेऊ शकस आनि रातनं हावामा उडीसन दुसरा ठिकानवर जाता येस. चेटकीनना वारसा ती दुसरा बाईकडे दि जास. मंत्र म्हनीसन ती दुसऱ्या बाईले म्हसनवटीमान ल्हई जास. तिठे रंगत पाजीसन नही तर जिवंत सरडा खाऊ घालीसन मंत्र शिकाडस. चेटकीन मानुसन काळीज खास आशे समजतंस. गावातली येखादी बाई चेटकीन शे आशे बडव्यानी सांग ते तिले ऱ्हाऊ देत नहीत. तिनं नाक-कान कापीसन गावना बाहेर हाकली देतंस. नही ते दगडसवरी मारी टाकतंस.

**सन उत्सव**

राठवा सन उत्साहात साजरा करतंस. सगळाच उत्सवमान भयान नाचगाना व्हतंस. व्हळी, दसरा, दिवाळी, इंद आनि दिवासो ह्या त्यासना परमुख सन शेतंस. व्हळी आनि दसराना 'मेळा' (जत्रा) भरतीस. ह्या लोकं जत्रामा नाचतंस. व्हळी आनि दसरा निश्चित येळवर करतंस. बाकीना सन गांवकरी येकत्र इसन करतंस. परत्येक गावनी दिवाळी, इंद आनि दिवासो येगयेगळा दिवस करतंस. म्हनजे येकच गांवना लोक दुसरा गावले 'तिवार खावा' म्हनजे सनना जेवनले जाता यी. ह्या लोक येकजुटमां राहतंस. गावमा पिकं चांगला नशेत नही ते बराच झन मरी गयात नही ते जनावर बराच परमानात मरी गयात त्याले देवना कोप समजीसन सनले साजरं करतं नहीत.

○

## आदिवासी समूह गीत

*राजेंद्र पावरा ह्या अक्राणी तालुकाना शेतंस. त्यासनी आम्हनापर मोकलेल ह्या आदिवासी समूह गीत अठे पावरी भाशामाच दिधेल शे.*

शूर आमू विर आमू आदिवासी आमू आदिवासी
काय कुणीने डर आमू आदिवासी, आमू आदिवासी
देह देव धर्मानकरता
लेद्य आमू खून...२ ॥धृ॥

आईने पेटमां लागी आमूह लवणेने रीत...२
दंधूलीने भिलखा हाते जुड्य आमरो नातो...२
लाख संकट झेलहू अहला आमू आदिवासी ॥१॥

जिकीने, लढीने मन्नू यज आम्हुं मुंदू...२
लढीने मन्नू मरीने जीवणू यज आम्हुं मुंदू...२
सवलतनकरता अेक ओयीने लवणारा आमू आदिवासी ॥२॥

**राजेंद्र मांगत्या पावरा**
मु. राडीकलम

# राठवासन्या भाशा आनि कला

सुभाष ईसाई

गुजरात राज्यना पुर्वकडला भागमा बडोदा जिल्हा शे. त्यावातला छोटाउदेपुर विस्तार हाउ आदिवासी परदेस शे. ह्या आदिवासीसजवळ सवतान्या निराळ्या येगयेगळ्या संस्कृतीसना वारसा शे. त्यासना जीवनना सगळाच अंगसमा हाई संस्कृतीनं दर्शन घडंस. ह्या आदिवासी निसर्गनासंगे आपलं निराळंच जीवन जगतंस आनि आजबी शहरीचाळीससमोर त्यासनी ती संस्कृती टिकाव धरी राहेल शे. रोजना जीवन यव्हहार, गाना, काहान्या, सन आनि जीवनना सगळा महत्वना आंगसवर आदिवासीन्या कला आनि संस्कृतीना खोलवर ठसा उमटेल आढळस.

ह्या परदेसमझारली भाशाविशयी सांगानं जयं ते ह्या सगळा परदेसभर येगयेगळ्या बोल्या बोलल्या जातीस. ह्या आदिवासीसनी भाशा तशी ते गुजरातीच शे पन निरनिराळा परदेसमझार तीना निरनिराळा बोलीरूपं बोलला जातंस. उदा - होयी, पालवी, राठवी, कोलची, नायकी वगैरे. सगळा छोटा उदेपुर परदेसले चार दिशासमा विभागी घीदं ते ह्या चारी भागसमा निरनिराळी बोली बोलली जास.

**गोदरियुं : बारिया होया विस्तार (झोझ - केवडी विस्तार) :** हाउ विस्तार पंचमहालनी हद्दीले लागीसन शे. आनि पंचमहाल जिल्हा ना देवगड बारीया तालुकाले जोडेल शे. ह्या भागतला लोकं सवताले बारीया कोळी म्हनी घेतस. ज्यासले 'होयां' म्हनीसनबी वळखतंस आनि त्यासनी बोली 'होयी' म्हनीसन वळखली जास.

**रेवाकाछ्युं (रेवाकाठ) - मोठी भोय (मोठी जमीन) :** कवांट-पानवड विस्तार. हाउ विस्तार नरमदाना काठपावत पोचेल शे. याना पुर्वले मध्यप्रदेश आनि नरमदाना तीथडे महाराष्ट्रनी हद्द येस. ह्या भागतली जमीन काळी आनि सपाट शे. आशी निराळी परकारनी जमीन ऱ्हावामुळे हया परदेसले मोठी भोय ( मोठी भुई/जमीन) आशे नाव पडेल शे. ह्या परदेसात राठवा आनि कोळी लोकसनी वस्ती शे. त्यास्नी बोली कोलची आनि भीली ह्या नावसवर वळखली जास.

**उगवती - राठ विस्तार (रंगपुर देवहाट विस्तार) :** हाउ भाग ओरसंग नदीना पुर्वकडला किनारापशीन सुरू व्हयीसन ओरसंगना काठकाठधरी पसरेल शे. त्या परदेशातली मुख्य वस्ती राठवासनी शे. आनि त्यासनी बोली राठवी शे.

**मावळती - पालविस्तार (तेजगड - पुनियावाट विस्तार) :** उदेपुर तालुकाना मझारला भाग आनि तेजगड कडला भाग पालविस्तार म्हनीसन वळखला जास. ह्या भागमा राठवा, बारीया, कोळी, नायक, भगत ह्या सगळास्नी वस्ती शे. त्यास्नी बोली पालवी आनि नायकी ह्या शेतीस.

येगयेगळा भागसमा येगयेगळी बोली बोलली जावा मुळे ह्या भागमा भाशानं खुपच 'वैविध्य' पाव्हाले मिळंस. त्यावातच छोटा उदेपुर विस्तार हाउ गुजरात राज्यनी शिमावरच ऱ्हावामुळे उगवतीले मध्यप्रदेशना पश्चिम निमाड जिल्हाले आनि नरमदा किनारवर महाराष्ट्रना खानदेस जिल्हाले लागीसन शे, त्यामुळे ती ती सिमावरली बोलीमझार हिंदी आनि मराठी शब्दसनी सरमिसळ व्हयेल दखास. ह्या सगळाच परदेस मझार लोकस्न भरपुर येनं जानं ऱ्हावामुळे सगळ्याच बोलीसमझार हिंदी आनि मराठी शब्द परिचयना शेतंस.

तशे पाहे ते ह्या परदेस मझारल्या बोल्या ह्या सगळ्या गुजरातीन्याच बोलीभाषा शेतीस. तरीबी त्यासना सवताना

आशा काही शब्द ऱ्हावामुळे गुजराती येनारासले सुद्धा त्यावातील बोली समजाले अवघड जायी. येवढंय नहीते ह्या परदेशातला लोकं नवनव्या वस्तुसकरता सवतानाच निराळा शब्द बनाडी घेतंस. त्यामुळे तशे पावाले गये ते मुख्य भाशासमझारला शब्द कमीच आढळतंस. उदा - विमान हवामा 'अध्धर' (अधांतरी) उडंस म्हनुन त्याले अध्दरीयुं म्हनतंस. राकेट त्यानामागे वायुना पट्टा सोडत उडंस. हायी बोलीमझार जुलाब व्हवाले 'सेरवुं' म्हनतंस. राकेटना पट्टा त्यासले तशाच वाटंस त्यामुळे त्या राकेटले 'सेराटीयुं' (हागरा) म्हनतंस. मारुतीकारसारखी उलशी गाडी जमीनले दबकिसन पळंस म्हनून तीले 'धूळचाटती' म्हनतंस. आशा परकारना बराच शब्द ह्या लोकस्नी वस्तु पाहिसन सवतानी बुद्धीपरमाने बनाडेल शेतंस.

इकडल्या बोलीमझार जोडशब्द नहिते जोडाक्षरं येकदमंच कमी वापरला जातंस. जोडशब्दसकरता आनि विदेशी शब्दसकरता त्या सवताना नवीन शब्द नहिते अपभ्रंश शब्द बनाडी घेतंस. उदा - ग्लुकोज बिस्कीट - घासघुस बिस्कुट, लक्स साबु - लपस साबु.

सगळा परदेस मझार येगयेगळा बोलीरूपं बोलला जावामुळे वार, महिना वगैरेसना नावं येगयेगळा ऱ्हातंस. उदा. -

वार :

| मराठी | राठ विस्तार | मोठी भुई |
|---|---|---|
| रविवार | दितवार | दितवार |
| सोमवार | भाभरियो, राजपुरीयो | कवांटियो |
| मंगळवार | डोडियो, पांडुडियो | पानवडियो, जूनलो |
| बुधवार | गुजरी | गुजरी |
| गुरूवार | देवनो | देवनो |
| शुक्रवार | जुनलो | उदापरियो |
| शनीवार | थावर, थावरियो, उदापरियो | थावर, थावरियो |

दिशा :

| मराठी | राठविस्तार | बारिया होया विस्तार |
|---|---|---|
| उत्तर | गोदरियुं | मळामोयुं-गोदरियुं |
| दक्षिन | रेवाकाछ्यु | कवोटियुं |
| पुर्व | उगमणुं | उगमणुं |
| पश्चिम | बुडमणुं | बुडमणुं |

महिना :

| गुजराती-मराठी | राठ विस्तार | बारिया होया विस्तार |
|---|---|---|
| (कारतक) कार्तिक | कातक | कोतक |
| (मागशर) मार्गशिर्ष | भरोळी | धरोळियो |
| (पोष) पौष | खिहेर, उतराण | उतरोण |
| (महा)माघ | डांडो | डोंडनो |
| (फागण) फाल्गुन | बैण्यो, होळीनो | बणलीयो |
| (चैत्र) चैत्र | चैतर | चैतर |
| (वैशाख) वैशाख | अखात्री | अखातरी |
| (जेठ) जेष्ठ | जेठ | जेठ |
| (अषाढ) आषाढ | अखाड | अखाढ |
| (श्रावण) श्रावन | सरावण | सरावण |

| | | |
|---|---|---|
| (भादरवो) भाद्रपद | भादवो, हराधनो, देगनो | हातियो |
| (आशो) आश्विन | दहरो, दिवाळी | वेदवाळीनो |

पशु :

| | |
|---|---|
| गुजराती/मराठी | राठवी |
| (गाय) गाय | वासेडी |
| (बळद) बैल | डगरो |
| (बिलाडी) मांजर | मांदरी |
| (भेंस) म्हैस | डोबी |
| (ससलु) ससा | सेसल्यु, देहल्यु |
| (हरण) हरिण | घुटाली |
| (शियाळ) कोल्हा | खोखडी, फोईफुंदाडी |
| (नरशियाळ) नर कोल्हा | कोल्यो |
| (मादाशियाळ) कोल्हीण/कोल्हामादी | कोलेय |
| (शाहुडी) साळु | शियाळवी |
| (वाघ) वाघ | वाघळो |

पक्षी :

| | |
|---|---|
| (कागडो) कावळा | ढाढियो |
| (गीध) गिधाड | गरज्यो |
| (चीबरी) घुबडनीजातना उलसा पक्षी | ढुडी |
| (समळी) घार | घुवेड |
| (बुलबुल) बुलबुल | हुडयियो |
| (सारस) सारस | कुरच्यो |
| (काळोकोशी) ड्रॉन्गो(इं.) | कळवीछलो |
| (टिटोडी) टिटवी | सिकवो |
| (गरूड) गरूड | गरध्यो |
| (चकली) चिमणी | घरचेडी |
| (घुवड) घुबड | ढूडी डाकेण |
| (लक्कडखोद) सुतारपक्षी | ठाठ ठोगडो |
| (बाज) ससाणा | हावेळ |
| (काबर) साळुंकी | खालेळ |
| (चामाचीडीयु) वटवाघुळ | माका ढुळु |
| (कलकलीयो) निळकंठ | ठेसो |

जीवजंतु :

| | |
|---|---|
| (आगियो) काजवा | आजीयो |
| (साप) साप | गहळो |
| (करोळियो) कोळी | कोल्यो |
| (गरोळी) पाल | घरवेळी |
| (देडको) बेडूक | डेटकुं |
| (मच्छर) डास | मच्यां |
| (पतंगियु) फुलपाखरू | भूबलुं |

(वाणियो) भिंगरी/भिंगोटा धांदरो
(खिसकोली) खार बूटी

आदिवासीसनी बोली आस्सल रूपमझार त्यासना मंत्रसमझार आयकाले मिळंस. ह्या बोल/मंत्र इतला जुना शेतंस की त्या शब्दंस ना अर्थ त्यासले सवताले बी माहिती नहित. नुसतं आयकीसन लक्षात ठेयलं ह्या मंत्र आजबी जशाना तशा शेतंस. उदा -

लीला पीळा देवोना तोरा
नवे भाट्यु ने नवे रे पांग्यु
देरां देवता उतरवा लाग्या
देख्या हळा न डोकांने हडे
सतीना पोरे देवतां रे आव
सतीना पोरे देवतां आव
एना देवता छते चड्यां
एतो अने रे कजीसे लेटों
बारे गज लेटां आल्या
विजळियामें खोंडां लीधां
केका वळां न डोकां कें हद्यां
लेटे वळवा मं माथां रे जेळां
खराळु में देवतां होयला
हरगु मे हेडो रे वाळ्यो

ह्या आदिवासीसनी कलाविशयी सांगान जयं ते ह्या भागातला आदिवासी येगयेगळ्या अनेक कलासमा पारंगत शेतंस. त्यास्नी सरवात महत्वनी कला म्हनजे पिठोरा देवना नवसना येळे काढतंस ने बीतवरलं चित्र म्हनता यी. हायी सोडीसन मोतीकाम, बांबु, कलाकुसर, माटीनं काम (हातीवरी माटीनी भांडी बनाडानं) लाकुडनं काम, लोकरनी कलाकुसर ह्यासारखा कामस्माबी ह्या लोकं नीपुन शेतंस. ह्या कलासकरता पुर्रा देसभरबी आनी देसना बाहेरबी परसीद्द शेतंस.

ह्या भागातला परतेकच मानुसकमी अधिक परमानमा कलाकार शेतंस. त्यावात संगीतमझार बासरी (पीही) हायी त्यासनं आवडतं वाद्य म्हनता यी. ह्या लोकं हातभर लांबा पावा आनी हुरो हायी मस्त वाजाडतंस. काम करता करता दमतंस, जंगलमझारून येकठा जायी ऱ्हातंस, तव्हळ ह्या आदिवासी बासरीमझारून ज्या सुंदर सुर काढतंस त्या आयकीसन झाडं झुडपं आनी सगळं जंगलच खुशीमा यीसन नाचाले लागतंस. आदिवासी पोरी बायाते गानं म्हनामा चांगल्याच नावाजेल शेत. लग्न ऱ्हावो नइते जत्रा ऱ्हावो नइते पिठोरा देवना उच्छाव ऱ्हाव, दोन दोन तीन तीन पोरी गानं म्हनतांना आढळतीनच.

## पिठोरा चित्रकला :

पिठोरा देवनं बीतवरलं चित्र काढाना उच्छाव हाउ खराते आदिवासीसना येक परकारना धारमीक उच्छावच से. तशेपावाले गयं ते हायी चित्र म्हनजे येक लगननी वरातनं चित्र ऱ्हास. ज्या घरधनीनी नवस करेल ऱ्हास त्याना घर बुधवारे सकाळीस पशीन रातपावत घरनी मोठी लांबलचक चवडी बीतवर हायी चित्र काढानं काम चालु ऱ्हास. पिठोरा चितारनारास्ले लखारा म्हनतंस. आनी चित्र काढाले 'पिठोरो लखवो' आशे म्हनतंस. हायी सगळं चित्र जवळ जवळ दहा

हात लांब आनि सहा हात रुंदीनं ऱ्हास.

सगळात पहिले जी बीतवर पिठोरा लिव्हना ऱ्हास ती लखारानी पांढरी माटीवरी जीले पांडुं म्हनीसन वळखलं जास तीनावरी सफेदी करतंस. हायी काम मंगळवारे करतंस. मंग बुधवारे लखारा पिठोऱ्याकरता लागनारा रंग तयार करतंस. कटवी नावना माटीना छोटासा भांडामा नयीते नारळनी करवंटीमाबी रंग तयार करतंस. रंगसकरता सुकी भुकी पावडर वापरतंस. हिरवा, पिवळा, लाल, शेंदरी निळीसारखा गडद नीळा आशा रंग वापरला जातंस. कटवीमझार दुध, फेवीकॉल (ज्याले त्या फीलीकलर म्हनतंस) कालवीसन त्यावातच रंगनी पावडरबी कालवतंस. हाउ येक परकारना धारमिकच उच्छाव ऱ्हावामुळे ह्या रंग मझार मोहनी दारूना येकदोन थेंबबी टाकला जातंस. आशा सगळा परकारना रंग तयार झाल्यानंतर पहिले घरधनीना हाते चित्रनी डावी बाजुना वरला कोपरामा आनी उजवी बाजुना खालला कोपरामा रंगना येकयेक फटका मारिसन लखारा पिठोरा लिवाले सुरवात करंस. मोठी भीतवर लखारा चित्र काडस आनि दोन्ही बाजुन्या भीतीसवर घरातला मानसं नयीते शिकाउ लोकं चित्रं काढतंस.

पिठोरामझार रंगाडला जानारा घोडासकरता येक साचा करेल ऱ्हास ज्याले डीबु म्हनतंस. पत्रावर धड, माथा आनि पायं कापीसन साचा बनाडेल ऱ्हास. साचा बीतवर लायीसन पाळीयावरी, चाकुवरी नयीते बानना फाळवरी घोडान्या रेशा आखी घेतंस. त्यानापुडे मग घोडाना कान, शेपटी, त्यानावर बसेल स्वार हायी सगळं लखारा हातीवरी काढंस. पिठोरामझार रंग भराकरना टोकरन्या बारिक बारिक कामटीसन्या येक तोंड ठेशीसन त्याना ब्रश करतंस. सगळा चित्रमा रंग भरायी गेल्यावर चांदीना रूपेरी रंगवरी चित्रनी किनार आखतंस. मझार ठिपका ठिपका ठीसन चित्रले चांगलं सजाडलं जास. पिठोरानं सगळं चित्र भयान मस्त ऱ्हास. त्यानामा येगयेगळ्या परकारन्या आयशी आकृत्या काडेल ऱ्हातीस.



पिठोरा चित्रना चारी बाजुसले काळा रंगना (गडद निळा) रूंद पट्टा आखतंस. त्याले 'धरित्रीनी हद्द' मानतंस. फक्त खालली बाजुले मधोमध मझार येवाकरता रस्ता ठियेल ऱ्हास. तठेच चौक पहारा करता येक नयीते दोन वाघ काढेल ऱ्हातंस. त्यासना पायखाल डुक्कर नयीते हरिन दाबी धरेल ऱ्हास. ह्या पट्टा मझार चौरस नयीते काही भुमीतीना आकार काढिसन त्यावात येगयेगळा रंग भरेल ऱ्हातंस. पिठोरामझार डावी बाजुले वरला कोपरामा सुर्य आनि उजवी बाजुना वरला कोपरामा चंद्र काढेल ऱ्हास. मध्यभागात पिठोराना पाच परमुख घोडा गनेश ना घोडा, पिठोराना घोडा, पिठोरीना घोडा, इंद्र राजाना घोडा आनि हूडोळना घोडा काढतंस. ह्या घोडासनावर नयीते खाल सर्पना आकार ना वाकडा तिकडा लांबा पट्टा काढतंस. त्याले 'अछाड' म्हनतंस. ह्या पट्टामझारबी चौकोनी आकार काडीसन त्यावात रंग भरतंस. पट्टाना वर तिरकोनी नक्षी काढतंस. तिना टोकवर फुलं ऱ्हातंस. मझार पक्षी काढतंस. अछाडना पुडला टोकले कमळनं फुल काढतंस.

पिठोराना पाच परमुक घोडासबरोबर आनखीबी काही घोडा काढतंस. उदा. 'नीहर' ना घोडा, 'साडदा'ना घोडा, 'कान्नीया'ना घोडा, 'रानी काजली' ना घोडा, 'जातर'ना घोडा, 'कन्नोरा देव'ना घोडा, 'कंदोरानी रानी'ना घोडा. घोडासना खाल पिठोरा चित्रना मध्यभागमा भोजराजाना अंबारीना हत्ती काढतंस. अंबारी मझार वहीलखारी काढतंस, तिले वीधीना लेख (कर्मना लेख) लिवनारी (विधात्री) म्हनतंस. पिठोराना संपुर्ण चित्रमझार अजुनबी काही चित्र काढतंस. सुपडकन्नो - सुपडासारखा कान ऱ्हातंस तो मानुस, येक टांगीयो- येक पाय ऱ्हास तो मानुस, बारा माथाना धनी, बाबा होडळ, गामदेव, वाळुहण, हादरजा देवनी हुंटवरली स्वारी, लगनन्या वस्तु घीसन येनारं वान्यानं जोडपं, शिकार खेळनारा डामोर देव, ढाक वाजीसन गानं म्हननारा टाटीया जोशी, ताडवर चडनारा मानुस, कैडो कुनबी, आभो कुनबी, दुध काढनारी बाई, भात घीजानारी बाई, घोडानी गाडी आनि गाडीवान, येरवर पानी काडनारी पनीहारी, ताक घुसळनाऱ्या दोन बाया, पोलीस चौकी, नागबाबा, वगैरे.

हायी सोडी प्रानी आनि जीवजंतुसपैकी कुत्रा, कोंबडा, कोंबडी, इचु, म्हैस, रेडकु, कोल्हं, वांदर, सयड्यां, हरन, मधमाशा आशा चित्र काढतंस. आनखी यहर, मळा, कोठार, छत्री, घडयाळ, हातपंप, यीवान, फटफटी, हेलीकॉप्टर, रेडु, टीवी यासनाबी चित्र काढतंस. पिठोराना डावा हातले ते जठे घरातला लोकं आनि शिकाउ पोऱ्या चित्र काढतंस तठे डावा हातले येकदम वरला कोपरामा नकटी भुतंननं चित्र काढतंस. पिठोरामझारला सगळा चित्र रंगीतच ऱ्हातंस. पन आवढं चित्र शेन मातीना सारनवर धवळा रंगवरी काढतंस. हायीच बीतवर खाल आगगाडीनं चित्र काढतंस.

आशे सगळं येकदम मस्त पिठोरान बीतवरलं चित्र काढीसन पिठोराना नवस फेडला जास. ज्यावातुन आदिवासीसनी कला येकदमच ठळक आनि परभावीपने दीशीयेस. पिठोरा लीवा करता सुरसी, मलाजा, गाबडीया आनि बरोज गावना लखारा (चित्रकार) चांगलाच नावाजेल शेतंस.

**मोतीकाम :**

आदिवासी पोरीसले आनि बायीस्लेबी दागिना घालाना चांगला सोस ऱ्हास. त्या सवताना हातीवरी 'किडीयु'ना (मुंगीसारखा बारिक मनीस्ना) माळा बनाडतीस. जीले येत नयी तीले दुसऱ्या बनाडी देतीस. कानमा घालानी बुट्टीसुदीक आशा मनीसपशीनच बनाडतंस. लहान मोठाला रंगीतमनी वापरीसन बनाडेल ह्या माळा त्यासना सौंदर्यमा भर घालतीस.

**बांबुकाम :**

छोटाउदेपुर विस्तार मझार निसर्गनी संपत्ती भरपुर परमानात ऱ्हावामुळे आदिवासी येगयेगळा झाडस्ना कलाकुसर करता वापर करस. बांबु ह्या भागमझार भरपुर परमानमा ऱ्हावामुळे आदिवाशी बांबुनी कारागीरीमझार भयानच पारंगत

शे. बांबुपशी त्या येगयेगळ्या वस्तु बनाडतंस. संगीतना चांगलाच शौकीन ऱ्हावामुळे या आदिवासी बांबुपशीन पीही आनि पीहा (बिल्लासभर लांबीनी छोटी बासरी आनि हातभर लांबा पवा) बनाडीसन वाजाड्तंस. सनना येळे आनि लगनमझार बासरी आनि पवा जास्त वाजाडतंस. बांबुपशीनच चाळण्या, टोपल्या, पाट्या, तुरड्या, करंड्या बनाडतंस. धान्य भरानी कनगीबी बांबुपशीनंच बनाडतंस.

**माटीकाम :**

या भागातला आदिवासी येगयेगळा परकारनी माटीपशी येगयेगळा सुरेख भांडा बनाडा करता नावाजेल शेतंस. रोजना वापर मझारला निरनिराळा माटीपशीनच बनाडतंस. रांधाकरताबी बहुतेक आदिवासी माटीनाच भांडा वापरतंस. भाकर रांधाकरता तवा (ठीकरू), डाळ शिजाडाले कांड्गो, कालवनकरता वाडगं, जेवासाठी थाळी आनी पानी भराकरता भुटवो, हांडलु, बथ, वाडगं, घागर हायी सगळं माटीवरीच बनाडतंस. ताडीन भांड पोक्युं सुदिक माटीनच ऱ्हास. हायी सोडीसन देवनी पुजा करता घोडा, हत्ती, उंट, वाघ ह्या सुद्धा माटीनाच बनाडतंस.

**लाकुडकाम :**

लाकुडपशी सुंदर मुरत्या बनाडाकरता गांठीया, गाबडीया आनि पिपलेजना कलाकार नावाजेल शेतंस. लाकुडमझारबी येकदम भारी आनि देखनी मुरती घडीसन त्या त्यासनी कला दखाडतस. याशिवाय लाकुडपशीच चाटवो (कनथा), घडीव दारं खिडक्या, खाट (बाज), पाट, खुरची, खेळणी आनि शेतीना आवजारं बनाडला जातंस.

**लोकरनं काम :**

आदिवासी बाया लोकरनं कामबी चांगल करतीस. लोकर गुपीसन त्यावातुन चुंबळ, पोरीस्ना केससमा लावान झुबका, गोंडा, पोऱ्यासना डोकाना रूमालले लावाना झुबका आनी कंबरले बांधाना रंगीत करदोडा बनाडाकरता त्या चांगलाच नावाजेल शेतंस.

आशा परकारे हला भागातला आदिवासी येगयेगळ्या कलास्मा पारंगत शेतंस आनि त्या आपली हायी कला येगयेगळा माध्यमसमझारून येकदम उत्तम परकारे परकट करतंस. हायी कलासमुळेच त्या देसपरदेसात नावाजेल शेतंस. आदिवासीसनी हायी कलाच त्यासनी संस्कृतीले जीवंत आनि रसरशीत ठेवस.

○

# राजस्थानना भिलसना

इतिहास आनि विकास

अर्जुनसिंह शेखावत

*राजस्थानमजारला पाली नावना गावमा अर्जुनसिंह शेखावत ह्या माध्यमिक शिक्षक शेत. आदिवासी इतिहास-साहित्य संशोधक-अभ्यासक.*

भारतमा जवळ जवळ ५०० आदिवासी जाती शेतीस. ह्या आदिवासीसमा भिल हाऊ मुख्य शे. राजस्थानमा मेवाड भागमा यासनी लोकसंख्या खूप शे. कवी श्यामलदास यासनी आपला 'वीरविनोद' ह्या इतिहासना ग्रंथमा विक्रमी संवत १९४७ ले भीलसनी संख्या १३४४२९ येवढी सांगेल व्हती. येवढी मोठी संख्यामजारला भिलसनी उत्पत्ती आनि इतिहास पाव्हासारखा शे.

**भिल उत्पत्ती ना येगयेगळा मतं :**

भिलसनी उत्पत्ती बाबत विद्वानसनं येक मत नही. काही उदाहरणं पाव्हासारखा शेतंस :

१) भील हाऊ शब्द मूळ संस्कृत भाशामजारला 'भिल्ल' शब्द ना अपभ्रंश शे.

२) महाभारत काळमा भिलसले 'निषाद' आशेबी म्हनेत. म्हनजे भिल शब्द ना अर्थ भेदनारा.

३) ज्यानी शुद्र व्हवाले नाकारं तो 'भिल' राह्यना.

४) रॉबर्ट शेफरनी निषाद् ले भिलसना 'पुर्वज' समजं.

५) भील जात खूप जुनी शे. इ.स. पूर्व ५०० त सुध्दा त्यासनी गनना व्हयेल शे.

६) आगोदर यासले 'पुलिन्द' नहीथे 'वनपुत्र' आशे म्हनेत. भील हाई जात इ.स. ६०० पशी रूढ जयी.

७) गुजरात आनि निमाड मजारला काही भिल अजूनबी आपुले 'भिल्ल' शेतंस आशे सांगतंस.

८) प्रा. गौरीशंकर हिराचंद ओझा यासनी भिलसनी उत्पत्ती 'अनार्य' पशीन जयी आशे मानेल शे.

९) हीरालाल आनि रसेल यासनी भिलसले 'कोल' नहीथे 'मुन्डा' जाती समजं.

१०) हेमन डार्क ह्या भिलसनी उत्पत्ती 'पंचमेल समूह' पशी मानतंस. त्यासनी उत्पत्ती अनेक जाती-जमातीसनं मिश्रन शे. म्हनून उच्च वर्गना लोक यासले भिल (भेळ) म्हनतंस.

११) डॉ. सुनीति कुमार चटर्जीना मते 'मीन' आनि 'शक' यासनं मिश्रन म्हनजे भील.

१२) रामचंद्र रानाडे यासना मत परमाने भील ह्या आपलापैकी शेतंस. आपू आर्य ते भीलबी आर्य. आपू अनार्य ते भीलबी अनार्य. त्यासना तोंडावळा त्या आर्य शेत आशे सांगस.

१३) मेजर के. डी. अर्सकोन यासना मतनुसार भील ह्या मूळ भारतीय शेतंस. हिंदूसनी आक्रमन करीसन त्यासले वनवासी बनाडं.

१४) पाश्चात्य विद्वानसनी भिलसले 'झाडना पानं नेसनारी जात' आशे म्हनेल शे.

१५) कर्नल टॉड ना मतनुसार भील हाऊ भारतना मूळ आदिवासी शे. भील हाऊ जंगलना आंडोर शे. भील हाऊ बाहेरून इयेल नही.

१६) जैन पुरानसमा भिलसकर्ता 'किरात', 'वनचर' आशा शब्द इयेल शेत. अवधी आनि ब्रज साहित्यमा 'व्याध', 'शबर' आनि 'निषाद' आशा शब्द भीलकर्ता इयेल शेत.

**भिलसनं मत :**

भगवान शंकरनी सगळात आगोदर बेलनं झाड तयार कयं आशे भील लोक मानतंस. येक मानोस ह्या बेलना पानं शंकरले पूजा म्हनीसन चढावाले लागा. बागे बागे पाहनारसनी संख्या वाढनी. तो भील पुजारी व्हयी गया. ते 'तिर्थस्थान' व्हयी गयं. तो पुजारी 'बीला' या नाववरी वळखा लागात. पुढे पुढे त्याना वंश 'बीला' या नाववरी वळखा लागात. पुढे पुढे त्या 'बीला' ना 'भीला' व्हयी गयं. त्याना वंश बी ह्याच नावधरी वळखा लागात. त्याच ह्या भील. कोनताबी भील आपुले 'भीला'च म्हनंस. शंकर हाऊ भिलसना देव शे. म्हनून भिलंसनी वस्तीमा शंकरनं देऊळ ऱ्हासच.

**ऐतिहासिक पार्श्वभूमी :**

भीलसना इतिहास स्वाभिमान आनि शूरवीर आशा शे. काही राजपूत राजाना सहाय्यक जयात ते काहीसनी सवतानं राज्यबी स्थापन कयं. ह्या भील शासनना नाववरतीन राजस्थानमा काही गावसना नावंबी पडनात. डुंगरना भील नाववरथीन डुंगरपूर, बासिया भीलना नाववरथून बांसवाडा आनि कोट्या भीलना नाववरथून कोटा आशा गावं बसनात. पाचवा-साहवा शतकमा ईडरवर येक भील सरदार शासक व्हता, ज्यानं नाव व्हतं मुण्डलिका बापा.

भील राजासवर राजपूत राजासन आक्रमन नेहमी व्हये. आकरावा शतकमा मेवाड आनि मध्यपरदेशमा काही ठिकानंसवर भीलसना अधिकार व्हता. बागे बागे राजपूत राजस्नी त्यास्नापशी परदेश जींकी घिदा आनि भिलसनी हार मानीसन त्या जंगलमा निंघी गयात. मध्यकालीन आशा काही इतिहास बाबरनामा, हुमायूनामा, टेवनियर, मानूमी आशा विदेशी पुस्तकसमा उपलब्ध शे.

अबुल फजलनं पुस्तक 'आइने अकबरी' ना उल्लेख करीसन कर्नल टॉड यासनी युवां गुहा ना राजतिलक ना बाबत लिहेल शे, 'गुहा हाऊ जंगलमा भीलसना सांगे राहे. त्यानी निडरता बामनससाई जास्त आनि भिलसनागत व्हयी गयथी. तो आता भिलसना मित्र व्हता ना म्हनून. भीलसनी जधळ आपला राजाना निवाडा कया तधळ त्यास्नी गुहाले पसंद कयं. येक भील जवाननी आपली करंगळी कापीसन त्याना रंगतवरी गुहाले राजटीळक लावा. हायी परंपरा खूप वरीस चालनी. आता त्या लोकसले 'गुहिलोत' नहीथे 'गरलोत' म्हना लागात.

आशाच प्रकारना बापा रावळले राजा बनाडामा त्याना दोन भिल मित्रसनं खूप मोठं महत्त्व शे. भीलसनी गादीवार बसाकर्ता राजकुमारना मस्तकवर आपलं रंगतवरी राजटीळक देवानं भाग्य लाभनं. आजसुध्दा ओगना आठला भील वंशजले बापा रावळना वंशजसले टिळा लावाना अधिकार शे. कर्नल टॉड नी आशेबी म्हनेल शे, टिळा लावायी गया का भील राजकुमारले मिठ्ठी मारीसन गादीवर बसाडंस आनि राजानी आरती करस.

**रानाप्रतापना भिलससांगे संबंध :**

सोळावा शतकमा राना प्रतापनी अकबर सांगे २५ वरीसपावत लढाई कयी. भीलसना खूप सहयोग मुळेच महाराना प्रताप लढना आनि त्यानं नावबी उजेडात वनं. त्या काळना मेवाड राजचिन्हमा चित्तोड कील्लानं सांगे राना प्रताप शे आनि दुसरा तीर कमान घीसन भील सरदार शेत. कुशलगडना राजचिन्हमाबी येक बाजूले रजपूत आनि दुसरी बाजूले भील शेत. कुशलगढमा ९२ टक्के लोकसंख्या आदिवासीसनी शे. आठे सुद्धा भील सरदार आपला रंगतवरी राजकुमारना मस्तकवर टीळा लावतंस.

**मानगड हत्याकांड :**

मानगडना डोंगरवर ७ डिसेंबर १९०८ ले जवळ जवळ येक लाख भील आपला धर्मगुरू गोविन्द गुरुना जवळ जाईसन भजन-किर्तन कराकर्ता येकत्र वनथात. हाई बांसवाडा आनि गुजरातनी सीमावर शे. गोविंद गुरू ह्या येक समाजसुधारकबी व्हतात आनि क्रांतिकारी धार्मिक नेता बी. भीलसले वेठबिगार बनाडनं आनि त्यासनावर येगयेगळा अमानवी अत्याचार करानं विरूध्द गुरूजीनी बंड पुकारेल व्हतं. इंग्रज सरकारना राजकीय दलालले याना पत्ता लागी गयथा. खैरवाडा आनि गोधरानी इंग्रज फौजसांगे स्थानिक राजानी सेनानीबी ह्या डोंगरले घेरी घिदं. सपाटीसवर तोफा चढाईसन गोळा फेकात. सगळा डोंगरना भाग हादरी गया. भोळा आदिवासी भक्तसले हायी सगळं राजकारन समजनं नही आनि त्या भजनमा गुंग राह्यनात.

इंग्रज फल्टननी आपल्या मशीनगनस आनि तोफासवरी सगळा भिलसले चुराडी दिधं. सगळीकडे रडनं, विव्हळनं, आक्रोशसन्या आरोळीसवरी हाऊ भाग दुमदुमी गया. भील कुठे जातीन ? सगळीकडे घेराव व्हता. शेवट गोविंद गुरूले पकडी घिदं. गोविंद गुरू पळू शकत व्हतात. लपी जाऊ शकत व्हतात. पन याले त्या भ्याडपन म्हनेत. मंग खटला चालना आनि गोविंद गुरूले फाशी दिधी. ह्यामा १५ शे मरनात आशे तर सरकारच सांगे पन खरा आकडा यासाई पन खूप मोठा व्हता.

स्वातंत्र्य आंदोलनमजारला जालियनवाला बाग हत्याकांड ते इतिहासमा 'अमर पाठ' व्हयी गया पन मानगढ ना डोंगरवरला आशाच मोठा हत्याकांडनी कोनले माहितीबी नही. कमाल शे !

**आनखी येक हत्याकांड आनि तेजा भील :**

हायी हत्याकांड 'सिराही भील हत्याकांड' म्हनीसन इतिहासमा वळखतंस. १९२२ मा सिरोही ना दीवान रमाकांत मालवीय तेजाजीले भेटाले गया, तधळ इंग्रजसनी बालोलिया आनि भूला गाव जाळीसन राख करी टाकं व्हतं. तेजाजी खूप दाव तुरुंगात गयात. ५ डिसेंबर १९६३ ले उदयपूरमा त्यासना मृत्यू जया. ह्या हत्याकांडमा काहीशेमा लोक मरी गयात.

मेवाडना महाराना कडथाइन भिलसले वेठबिगार करनं आनि त्यासनावर बळजबरी करामुळे मोतीलाल तेजावत नावना भिलानी, जो जागीरदारनं घर कामले व्हता, त्यानी नौकरी सोडीसन भील क्रांती कराना बिगूल वाजी दिधी. अत्याचार, अन्याय , शोशन ह्यासपशी मुक्ती मिळावाकर्ता त्यानी भिलसले संघटीत कयं आनि आंदोलन उभारं. हायी आंदोलन 'येकता आंदोलन' म्हनीसन वळखतंस. त्याना प्रभाव राजस्थानबरोबरच गुजराथमाबी पडना. ह्या आंदोलनमा भिलसनी निश्चय कया, ''आमना स्वाभिमान इकनार नहीत आनि वेठबिगारी बी करनार नहीत.''

नीमडी (गुजरात) गावमा खूप संख्यामा भील येकत्र वनात. तिकडे रियासती सरकारनी तेजावत सांगे समझोता करानं नाटक कयं आनि येकदम रियासती सैन्यनी गोळीबार सुरु कया. ज्यामा १२०० भील मरी गयात. आठोंग भीलसनी तेजावतले उचलं आनि अज्ञातवासमा घी गयात. हाऊ अज्ञातवास आठ वरीस ऱ्हायना.

**गोगा भील नं बलिदान :**

गोगा पीपलियाना राहनारा व्हता. मेवाडी राना जयसिंग जधळ जयसमंद तलावनी दक्षिन भागना बांध बांधी राह्यना व्हता तवळ दिवसभर बांधेल बांध रातले धसी जाये. म्हनून राजा खूप काळजीमा पडना. येक दिवस राजाले सपन पडनं, जर गोगा गमेतीले त्या बांधमा जीवंत गाढी दिधं ते बांध धसनार नही. रानानी हायी गोगाले जायीसन सांगत, गोगा तयार जया. जीवंत गोगाले बांधमा गाढी दिधं तैनपशी बांध धसाना थांबना. हाऊ गोगा भिलसना पुढारी व्हता. ह्या

बलिदानमुळे रानानी पीपलिया गावले स्वतंत्र राजधानीना दर्जा दिधा आनि त्याना कारभार गोगाना कुटुंबवर सोपी दिधा. न्याय कराना अधिकार सुध्दा दिधा. आतापावत म्हनजे राना भूपालसिंग पावत ह्या अधिकार राह्यनात. आजपावत जो कोनी राना ह्या भागातून जास ते पीपलिया गावनी सीमापन उतरीसन पाये पाये चालीसन गोगानं घर जाईसन त्यासना कुटुंबले भेटतंस. लोककल्यानकर्ता गोगानं बलिदान अमर शे.

**स्मृति चिह्न नहीथे स्मारक :**

भिलसनी शूर वीरता आनि बलिदानसमुळे खूप स्मारकं तयार व्हयेल शेत. भिलसशिवाय बाकीना समाजमाबी त्या आस्थाना विषय व्हयेल शेत. यासले लोकदेवता म्हनीसन मान्यता मिळेल शे. वेणीया नावना भील मोघलस सांगे लढता लढता मरना. भील इंग्रजससांगेबी लढनात. भील भगतबी व्हयनात.

**पलायन :**

बेकारी आनि बेरोजगारीमुळे हैरान व्हयीसन यासले बराचदा घर सोडीसन मजूरीकर्ता बाहेरगाव जानं पडस. दुष्काळना दिवसातबी आशीच आफत येस. आता तो मजूरी कर्ता आसपासना गावसले जास. काही भिलसस्न्या वस्त्या शहरमा बसन्यात. जंगलपुत्रना खावापेवामा आनि राव्हामाबी त्यामुळेच खूपच फरक पडी राह्यना. आदिवासी संस्कृतीना हाऊ संधिकाळ शे.

**धर्मांतर :**

आदिवासी हाऊ खूप भोळा ऱ्हास. म्हनून तो ताबडतोब लालुचले ठगायी जास. इसाई मिशनरी यासले लालुच दखाडतंस. त्या यासना सुखदुःखमा मदत करतंस. आजारपनमा कोनतीबी फी न घेता यासले औशदपानी देतंस. शाळा-दवाखाना काढतंस. पैसाबी देतंस. पन यासना मुख्य उद्देश धर्मांतर करनं हाऊच ऱ्हास. आशा खूप घटना व्हयेल शेतीस. काही वर्तमानपत्रासमा वाचाले मिळंस. हायी विचार करवा आशी बाब शे.

**झाडझुडपनी आवड :**

भील ह्या मूळ डोंगरना रहिवाशी शेतंस. त्या डोंगरपुत्र आनि जंगलपुत्र शेतंस म्हनून त्यासले आसपासना वातावरन विषयी प्रेम वाटनं 'स्वाभाविक' शे. भील झाडंसनी पूजाबी करतंस. जडी-बुटीनं औशदबी करतंस. झाडसवरथून नाव सुद्धा त्या ठेवतंस.

पिपळना झाडसवरथून गावनं नाव पीपळी नहीथे पिपळीया आशे ठेवतंस. आशा प्रकारना बिल झाडवरथून बिलडिया, महुडा (मोह) वरथून महुवाडा, बरू वरथून बोरूवाडा, कंथार वरथून कंथारिया, इमली वरथून आमलिया आनि बोर वरथून बोरी नावनं गाव बसेल शे. वडंसना जास्त झाडं म्हनून गावनं नाव वडगाव. 'मीठा नीम' ह्या गावमा गोड नीम खूप शेत. 'धावडीया' ह्या गावमा खूप धावडी झाडं शेत. मोढ नी शेती जास्त व्हवा लागी म्हनून त्या गावले 'मोरढ' म्हनाले लागनात.

झाड कोनी तोडाले नको म्हनून भील लोक झाडसना बुडपन येखादी लोकदेवता स्थापन करतंस. म्हनजे देवना धाकखाल कोनी त्या झाडले तोडत नही. काही काही झाडसना बुडवर मानोसनी आकृती काढी देतंस. काहीसवर आसरा काढी ठेवतंस. काहीसवर त्रिशूळ काढी देतंस. आशा झाडंसले शेंदूर लायी ठिवा ते झाडसनं आपोआप रक्षन व्हस. पर्यावरनलेबी भीलस्ना खूप हातभार लागेल शे हायी मान्यच करनं पडयी.

○

# तवपावत काढवा याळ...

सुधीर देवरे

*'तवपावत काढवा याळ' हायी सुधीर देवरे ह्यासनी येक कथा (गोष्ट) शे. हायी गोष्टनी नायिका-सायला नावनी भिल्लीन शे. हायी भिल्लीन आपुले तिनं सवतानं आत्मकथन (गोष्ट) सांगी राह्यनी आनि आपु आयकी ऱ्हायनूत आशी हायी गोष्टनी रचना करेल शे.*

काय भाऊ... माले वळखं का... काय वळखं नशे... तैन तू उलसा व्हतास.. मी तवाडानी भिलाटीमजारली सायला. मी रांडकी शाऊस. मन्हं आज येकबी पोरसोर जीवंत नही, पन माले गंज आठ पोऱ्या जयथात. जैन्ह मी तवाडानी भिलाटीमा लगीन करी वनथू तैन मी बारा-तेरा वरीसनी व्हसू. येकेक आंडोर व्हये आनि मरी जाये. कशातरी येक आंडोर आनि येक आंडेर वाचना व्हतात. डोंगर नाईक हायी मन्हा मानोसनं नाव व्हतं. धंदा दारू गाळाना व्हता.

गावमजारला कोनताबी शेट सावकार कडथायीन व्याजूने पैसा घिवूत. नवसागर, गूळ आनीसन मना मानोस दारू गाळे. दारू गाळानी भट्टी नदीमा येक ढेंगडानं आडे व्हती. पहिली धारनं फूल पेवाकर्ता गावमजारला मोठमोठल्ला लोक तठेच इयेत. मंग फुगा भरीसन दारू घर आनी का पंधरा दिवस ती दारू इकीसन परपंच चाले आनि त्यावातलाच उरेल पैसासमातीन आखो नवसागर, गूळ घिसन दारू पाडानी. पन तशे शिलकी काही राहेना. व्याजूने आनेल पैसा सुध्दा काही दाव परत करता इयेत ना. आखो व्याजूने पैसा घेना पडेत. त्याना बदलामा घरमजारलं येखादं बघोनं नहीथे गुंडा गहान ठेवना पडे. पन आशा का व्हयेना आमना परपंच आडखळत बरा चालना व्हता.

येक दिवस पोलिस वनात. पोलिस साधा कपडामा व्हतात त्या मुन्ह त्या काय वळखू वना नहीत. त्यासनी गिऱ्हाइक सारखं इचारं, 'दारु शे का ?' धनीनी 'हा' म्हनतं. येक बाटली काढी दिधी. वळखना नव्हतात. पन आमले वाटनं, वना व्हतीन गावमा कोनाकडे पाव्हना रावळा. त्या म्हनेत, आखो पाहिजे. धनीनी फुगा काढा. तवश्यात येक गडीनी मना मानोसनी मानगुटीच धरी घिदी. म्हने ,''चाल पोलीस ठेसनले. दारु पाडस नहीका'' दुसरानी सगळा फुगा हातमा घि घिदा. मी गलका करा लागू तवशी दुसरा म्हने, ''बाई जास्त आवाज करु नको. आम्ही साध्या वेशातला पोलीस शेतंस.'' मन्ही ते दातखिळीच बशी गयथी. कोनीतरी आमना गावमातीनच पोलीसले खबर दियेल व्हयी. पोलीस धनीले वढत मारत घी गयात. त्यासनी गावनं हेटे गाडी आनेल व्हती. गाडीमा मारझोड करत ढकली दिधं आनि लयी गयात सटनाले. मी गंज पाय पडी पाह्यात पन त्या निगरगट्ट व्हतात. त्यासनं काय काळीज इरघळनं नही. मंग मी गावना पाटीलकडे गवू. हातपाय पडात. मन्हा धनीले सोडी आना आशे कळवळनू. पाटील म्हने,'' आजना दिवस जाऊ दे. सकाळ सोडी आनसू''. तशीच कळवळत बसनू. पोऱ्या रडेत. त्यास्नाकर्ता तशीच ती रात काढी. दुसरा दिवस रामपाऱ्हेच पाटीलकडे गवू. सटनाले जावाकर्ता रावण्या कयात. मंग पाटील सटनाले गया. संध्याकाळे पाटीलनी मन्हा धनीले जामीनवर सोडी आनं. पन धनीनी तैनपशी जे पोट दुख्खाडं ते शेवटपावत आंथरूनमातीन ऊठनाच नही. इचारं ते म्हने,''पोलीसनी बुटनी लाथ पोटले बसनी व्हती. तवळपशी सारखं पोट दुखी ऱ्हायनं.'' गावमजारला डागटरकडे

दखाडं. पन तो काहीच सांगेना. फगत सुई दिये.. गोळ्या लि दिये आनि येवढा पैसा लागतीन, आशे सुई देवानं आगोदरच सांगे... शेवट महिना दिड महिनामा धनी आवरी गया. हातले लागना नही. मन्हा मानोस कोना खून करता ते सरकार त्याले फाशीवर धाडतं. मंग मना नवराना पोलीसनी खून कया ते साधं पोलिससले खसकाडानंबी मन्हा मनात वनं नही. आनि गावनीबी काही कयं नही. फगत नशीबले दोश दिसन छातीवर दगड ठिसन गप बसनू. धनीना सांगेच दारूना धंदा बंद जया. कोनं निंदनं, खुरपनं, कापनं करीसन, गवत इकिसन दिवस ढकली ऱ्हायनू व्हतू.

येक आंडोर... येक आंडेर वाचेल व्हतात. त्यासनाच तोंडकडे पाहीसन याळ ढकली ऱ्हायनू व्हतू. आंडेरनं लगन करी दिधं. जवायी आड खंदे आनि मन्ही आंडेर मातीनी भरेल शिकाळी रहाटवरतीन वर वढे. येक दिवस शिकाळी वढता वढता तिना तोल गया आनि तिनाबी खेळ खल्लास व्हयी गया. लगन जयं तैन तिले पाहेल व्हतं आनि हाऊ निरोप वना तैन तिनं मढंच दिसनं माले. आंडेरनं येळेबी आंडोरकडे पाही मन घट्ट कयं.. दुसरं काय करता यी मंग...

आंडोर नदीमा मासा... खेकडा धराले जाये... मासा गावमा इकी इये. मी निंदनं, खुरपनं आशा काम करीसन कशे तरी जगी ऱ्हायनू व्हतू. आनि येक दिवस मन्ह नशीब आखो आशे फाटनं ते मन्ही नजरच फाकी गयी. मन्हा भाऊ मासा धराले गया. खडकनी कपारमा त्याले काहीतरी खुडबुड दिसनी. त्याले वाटनं खेकडाच शे. भाऊनी मजार हात घाला नि काय... हात मांगे काढा ते भल्ल मोठं जनावर त्याना मनगटले वेटोळं मारीसन त्याले चायी फोडनं. दुसरा हात घाई त्यानं येटोळं सोडीसन ते जनावर त्यानी दूर फेकं खरं, पन हातवरथीन भळभळ रंगत वाही राह्यनं व्हतं. त्यानी तो हात नदीना पानीवरी धुई घिदा आनि भिलाटीमा यिसन झोपडीमा झोपी घिदं. त्यानी हायी गनपाले सांग व्हतं. तधळ मी कोनातरी वावरमा निंदाले जायेल व्हतू. संध्याकाळे वनू ते भाऊनं काम व्हयी गयथं, भाऊ हायी भिलाटीमा ऱ्हायना नव्हता... माले हायी मांगताईन गनपानी सांग. गनपा धावपळ करता ते मना भाऊ वाचीबी जाता. पन नशीब नजर बांधी वनं ते कोनले काय करता यी...

...मी कनी भाऊ संजय गांधी निराधार योजनानी मनीआर्डर घेवाले वनथू.. म्हनतं, इयेल व्हयी ते घी जाऊत. पन आजून काय इयेल नही. आता आशेच जगवा मंग.. काय करवा.. मरन येत नही तवपावत काढ्वा याळ.. येस मंग.. तुनं कशे काय चालनं... बरं शे ना...

O



# कष्ट हाइच भांडवल आनि नफाबी

कानजी पटेल

*श्री कानजी पटेल ह्या गुजरातमजारला लुणावाडामा इंग्रजीना प्राध्यापक शेत. गुजराती भाषाना प्रसिध्द साहित्यीक-कादंबरीकार आनि कवी शेत. 'गद्यपर्व' नावना प्रसिद्ध गुजराती मासिकना संपादक शेत. त्यास्ना साहित्यीक आनि सामाजिक कामकर्ता कानजी पटेल गुजरातमा नावाजेल शेत. आठे त्यास्नी गुजरातना पंचमहाल जिल्हाना भिल्ल आदिवासीनी परिस्थितीनं वर्नन करेल शे.*

पंचमहाल, दाहोद जिल्हासमजारला आदिवासीसमा खूप येगयेगळा कुळं शेतंस. डामोर, कामोल, भाभोर, भगोरा, भीलताक, मेडा, गरासिया, तंबोकिया, देवदा, वागजिया, चंदाणा, वहोनिया, संगाडा, हठीला, आमलियार, निनामा, भमात, भूरिया, अड, वसैया, पलास, चारेल आशा कुळं संतरामपुर, झालोद, दाहोद, देवगढ बारिया, लिमंखेडा, फतेपुरा ह्या तालुकासमा त्यासनी वसती शे.

शेती, शेतमजूरी तसेच शहरसमा इमारत बांधकामवर मजूरी करीसन आपली गुजरान करान पदरना उलसा जमनीना तुकडावर निभाव लागत नहीं म्हूनून काही लोक ते बाराबी महीना गाव बाहेर आजूबाजूना सधन गावमा शहरमा काढतंस भटकत राहतंस. त्यामुळे पोऱ्यासले शिकाले मिळत नही.

ह्या आदिवासी लोक कोदरी, बरी, बालरा, मका, जतारी, तांदूळ, गहू, तूर भाजीपाला आशा पिक पिकाडतंस. पावसाळा हिवाळामा थोडंस आशे उत्पन्न येस.

मकई आनि गहून्या भाकरी हाऊ त्यासना मुख्य आहार शे. भाकर पळसना दोन पानसना मजार ठिसन निखारावर पानगं ठेवतंस. आनि हायी पानगं ताक नहीथे चटनीसांगे खातंस. भात सनसुदना दिवसंस मिळंस लगनयवतले वरनभात खातंस. काही लोक लांडगा मारीसन खातंस ते काही बोकड्या, कोबंडी, हेला मारीसन खातंस.

दबेल बुटकं कौलारू छपर, टेकडासवर येकट दुकटं घर. येक दारनं. त्यामजारतून लवीसन जावानं. गोठानं बाजूले बाहेर निघता येत नही. बाजूले पडवी ऱ्हास. तिना उपयोग चारा भराले, झोपाले व्हस. पावना वना ते तो बी पडवीमाच झोपंस.

घरात जावानं आगोदर वसरी ऱ्हास. मंग मजारलं कोठी घर. त्यामा दोन चार उलश्या मोठल्या कामडीसन्या कोठ्या त्याले अकबरला म्हनतंस. त्यामा धान्य नहीथे बाकीन्या चीजवस्तू भरी ठेवतंस. घरमजारला त्याना आतला भाग बंदिस्त ऱ्हास.

उलशी खिडकी नहीथे झरोका घरसले ऱ्हातं नहीत. भीती कामड्या, लाकडी नहीथे मातीन्या ऱ्हातीस. घरनं थोडं बर जयं ते त्याना घर येक दोन खाटा ऱ्हातीस. वडील मानूस खाटवर झोपंस. बाळतिनबाईलेबी झोपाले खाट देतंस. पोरं सोरं मात्र भुईवरच. संध्याकाळे आठ वाजताच झोपी जातंस. सकाळीज मात्र पाच वाचता उठतंस. दातन लावानं मात्र नक्की. आंघोळनं तशे काही नही. हातपाय, तोंड वरतीन पानी फिरायं तरी चाली जास.

दारू सवताच पाडथीन. खास करीसन महुआ आनि गुळनी. उंबरं रायन्या आनि खजूरनीबी दारू गाळी पितंस. बाजारू दारू ह्या लोक पितं नहीत. दारूसांगे मांस, कोंबड, भाजी सनसुदीलेच मिळंस. नेहमी मात्र भाजका चना, कांदा यासनावरी काम भागी जास. बाया आनि मानसं येकत्र बशीसन दारू पेतंस. पाहुनासनं आगत स्वागतबी दारूवरीच व्हस. मयत प्रसंगले दुःखी लोकसकर्ता आपला घरून दारू घी जानी पडंस. लगननं येळेबी यजमानना घर दारू घी जानी पडंस, त्याले उधूनी करनं आशे म्हनतंस. नवरदेवले आहेर करानं येळे दारूनं मडकं मधोमध ठिसन सगळा पेतंस. ससा, हरिन, तितर, होला नहीथे कोनताबी पक्षी मारी खातंस. सरळ विस्तववर टाकीसन भाजीसन खातंस. शिकार मोठी ऱ्हायनी ते मीठमिरची लायीसन कव्हळ तेल टाकीसन भाजी बनाडतंस.

भानगड्या (मध्यस्थी) पोरा-पोरीसन लग्न ठरावंस. नवरीना मेहुना पानीनी साक्ष नहीथे अग्नीनी साक्ष काढीसन ७फेरे करस. म्हनजे लगन लावस. पहिला चार फेरा नवरदेव पुढे राहीसन करतंस. नंतरना तीन फेरा नवरी पुढे करीसन पुरा करतंस. लगननं आगोदर हळद लावतंस. तीन, पाच, सात नहीथे अकरा दिवसपावत हायी हळद ऱ्हास. त्यानंतर मंग लगन लागंस. नवरदेवना घरथून नवरीना घर जातंस तधळ सोबत भाकरी बांधी घी जातंस. तठे जाता बरोबर ह्या भाकरी खातंस. वऱ्हाड वावरमा उतरस. झाडखाल, नवरीना बापकडथून वरन-भात मिळस. कोनी ते येकच दिवसमा लगीन करी परततंस. कोनी कोनी रातले मुक्काम करी दुसरा दिवस परत जातंस. सगळीच जागे नवरीनं घर वऱ्हाडले जेवन मिळत नही. काही काही जागे नवरीना बाप नवरदेवकडला वऱ्हाडले कोरडा शिधा दि टाकंस. वऱ्हाड तो कोरडा शिधा आपला गावले घी येस. दुसरा दिवस नवरी मोठा मानससना पाय पडस. आनि आखो बापनं घर जास.

दिवाळी, होळी, जन्माष्टमी, फाल्गुनी येकादशी ह्या ह्यासना खरा सन. ह्या सनसले वरन-भात आशे जेवाले ऱ्हास. होळीले गहूचनानं पीठ येकत्र करीसन कोंजळ बनाडतंस. दिवाळीले नव वरीस म्हनतंस. होळीना दुसरा दिवस इस्तववर चालीसन नवस फेडाना रीवाज शे. पोरंबाळं आजारी पडनात ते गरबाना नवस घेतंस. नवरात्रमा नहीथे दिवाळीनंतर आशा नवस फेडतंस.

ढोल, कुंडी, थाळी, सनई, पावा, बासरी ह्या त्यासना वाजा ऱ्हातंस. नाचले त्या चाळा म्हनतंस. येकनंतर येक अशा ह्या चाळ वाढत ऱ्हातंस. त्यासले त्या पहिला चाळ दुसरा चाळ आशा नावं दिसन वळखतंस. लगननं येळे उलसा 'ढोल' वाजतंस. उच्छावना 'ढोल' मोठा ऱ्हास.

नाचना परकार - गपूली, आंटिया (दांडिया), वावळु, घसियु(तलवार घीसन) अशा ऱ्हातंस.

सनसुदले, बाजारले जावानं येळे, लगनले जावानं येळे, नवस फेडाना दिवस ह्या आदिवासी ढोल, सनई, कुंडी, आनि थाळीना चालवर नाचतंस. मानसं, बाया, पोरं सगळा येकत्र नाचतंस.

गावनी शिववर, टेकडीवर, नदीवर नहीथे उतारवर गावदेवनं ठीकान ऱ्हास, कुठे गावदेवीबी ऱ्हास. कसुमोर या नावना महादेवबी ऱ्हास. कोनी कबीर, गुरु गोविंदसिंह, धाध भगत पंथ, प्रणामी पंथ, भाथीजी यासनाबद्दलबी श्रध्दा दखाडतंस. बायासमा आशी श्रध्दा खूप शे.

गायधणी-गावदेव हाऊ येक देव शे. तो गावना रक्षक. येक गावथून दुसरा गावले निंघनूत आनि वाट चुकनूत ते गायधनी रस्ता दखाडंस. त्यानं देऊळ ऱ्हात नही. मात्र ठिकान नक्की ऱ्हास. ते ठिकान म्हनजे येखादं झाडं, डोंगरमाबी देव ऱ्हास. टेकडीसुध्दा देवच ऱ्हास. शनि, सोम ह्या वारसले आनि आमली, येकादशी, व्हळी आशा सनसले उपास करतंस.

कोना घर देवी-गोवर निंघनात ते त्याकर्ता नवस बोलीसन भीतवर शेनवरी फुल्या काढतंस. हाही काम भगत करस.

सगळा समाजनं समेलन आशे भरत नही. पन कोनले नवस फेडना जया ते तो भरावस. ह्या नवसमा दारू,

बोकड्या, वरन-भात आशे जेवन ऱ्हास. ताप नहीथे आजून येकादा रोग काढाकर्ता पुजारा मंत्र म्हनस. आजारपनमा मंडोल नावनं गानं गातंस. बांबूनी कामटी जमीनवर ठोकानी आणि गानं म्हननं.

पोरे आमली पीपली, लाकडी चेंडू, विटीदांडू, गोट्या, लंपडाव, वाघबकरी, पोहनं, धावनं, टेकडी चढनं, बुडी मारीसन श्वास रोखनं, तीरकामठ्यासवरी नेम धरनं, आशा खेळ खेळतंस, तीनेक वरीसना पोऱ्यासले उलशी उलशी कामं देतंस. आठनऊना व्हताच बराच मोठला काम देतंस. घरना कारभार वडीलधारा मानूस सांभाळस. म्हातारासलेबी कामं करना पडतंस. बाया मानससना बरोबरखाल काम करतंस. तेल-तुप सनसुदलेच खावाले मिळस.

पिकाडेल अन्नधान्य, भाजीपाला बाजारात घी जातंस. दोहोद ले बुधवारे, झालोदले सोमवारे, संतरामपुर व लिमडीले मंगळवारे, लीमखेडाले रविवारे, सुखसरले गुरुवारे हाट बाजार भरस. संजेली, फतेपुरा, देवगढबारीयाले शुक्रवारे बाजार भरस. कोंबड्या, बकऱ्या, गाई, म्हशी, बैल, तीर-कामठे, विळा, पाळीये, मडकी, तयार कपडा सगळं बाजारात इकाले ऱ्हास. मानसं लाल पिवळा, आकाशी सदरा घालतंस. सफेद कपडा गुंडाळी करीसन डोकाले पागोटासारखा गुंडाळतंस. लंगोटी, पोतडी (धोतर) चादर नेसतंस. बाया रंगीबेरंगी, झंपर, परकर, ओढनी नेसतंस. लहानपोरं नेहमी उघडाच ऱ्हातंस. बायासना पायमा, नाकमा भांगमा चांदीना कथीलना दागिना ऱ्हातंस.

मोठी पाळीमा मडक, छज, पावडं, कुदळ, पोर, घीसन काम मिळयी आशा गावनी शिववर पडाव टाकाना. आशे बराच गावं फिरना. पाऊस पडना का आपला गावले परत येनं. ज्याना वावरले आजिबात कस नही आशा लोक ते पावसाळातबी पंचमहाल, दोहोद या बाकीन्या जातीसन्या वस्तीमा शेती आनि मजूरीना काम बारमाही करत ऱ्हातंस. झालोदन्या खानीतून दगड काढाना, विकाना आनि त्यातलाच मजूऱ्या करीसन ऱ्हातंस. झालोदी दगड घरना तळघरमा बसाडाकर्ता वापरतंस. फिक्या लाल, निळसर, रेतीसारखा कठीन आनि मऊ दगडवरी ह्या दोन्ही जिल्हातला बराच गावमजारला शेतकरीसना तळघरं बनेल शेतंस. पटेल, बामन, क्षत्रियसनी वस्ती राहेल गावस्ना शिववर गुरं चारानी जमीनवर त्या ऱ्हातंस. चार सहा लाकडसना खांबसवर साग नहीथे पळासना पानं टाकीसन त्यामा त्या ऱ्हातंस. गावमा मजूरी करतंस. सपूर्न गुजराथमा कोनताबी गावात गयं, तरी पंचमहाल दाहोद ना आदिवासी पाव्हाले मिळतीन, गंवडीकाम, मजूरी, रोपनी लावनी, कापनी आशा कामं त्या करतंस. काहीसन्या म्हशी वाढायी मोठ्या करीसन त्यातला अर्धा भाग त्या घेतंस. समाजमा नहीथे दुसरीकडेबी कोनी चोरी करत नही. हताश व्हयीसन कोनी आत्महत्याबी करत नही. वैर जयं ते मारामारी मात्र करतंस.

काही शिकेल सवरेल लोक आता राजकारनमाबी पडाले लागात. दोन तीन बाया आश्रमशाळा, छात्रालय चालाडी ऱ्हायन्यात. ग्रामपंचायत, तालुका पंचायत, जिल्हा पंचायतमा येक दोन बाया सभासद शेतीस. येक बाई जिल्हा शिक्षन समीतीनी अध्यक्ष व्हयेल शे. विधानसभा लोकसभा पातळीवर चार-पाच व्यक्ती मांगला पन्नासेक वरीसपशी राजकारनात शेतंस. स्नातक, अनुस्नातक, डिप्लोमा, डॉक्टरी, इजिनियरींग या क्षेत्रसमा आजपावत जवळ जवळ तीन चारशे जन व्हतीन. सरकारी नोकरीमा हजारेक व्हतीन. प्राथमिक माध्यमिक शिक्षक शंभरेक व्हतीन.

पशुपालन, शेती, व्यापार आनि बाकीना काही व्यवसाय आठला आदिवासीसले नीट जमना नही.

आवढं ते अगदी नक्की शे, ह्या लोकसले त्यासना कष्ट हायीच त्यासनं भांडवल शे आनि हाऊच त्यासना नफाबी शे. आनि ह्या कटू सत्यना अर्थ मात्र काळीज कुरतडनारा शे.

O

